


नोंदणी क्रं. एफ.१६०९४(मुंबई)





महाराष्ट्र शासन
मराठी भाषा विभाग
**राज्य मराठी विकास संस्था**
एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,
धोबीतलाव, मुंबई - ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६
संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com

# निवेदन



अनुक्रमणिका








२९४७

अं. १२९ . १३० . १३१ . १३२

संपादक - वा. रा. ढवळे


वर्ष 33 अंक १२९ एप्रिल-मे-जून १९५९
वर्ष 33 अंक १३० जुलै-ऑगस्ट-सप्टेंबर १९५९
वर्ष 33 अंक १३१ ऑक्टोबर-नोव्हेंबर-डिसेंबर १९५९
वर्ष 33 अंक १३२ जानेवारी-फेब्रुवारी-मार्च १९६०

# महाराष्ट्र साहित्य-पत्रिका

महाराष्ट्र साहित्य परिषदेचें त्रैमासिक मुखपत्र

संपादक
वा. रा. ढवळे

वर्ष ३३ : अंक १२९ एप्रिल-मे-जून १

या अंकांत

प्रा. कृ. मो. शेंववणेकर, डॉ. र. वि. हेरवाडकर, प्रा. पंडित आवळीकर, डॉ. गं. ब. ग्रामोपाध्ये, प्रा. भवानीशंकर पंडित, डॉ. के. ना. वाटवे, शिवाय संपादकीय, परिषद्वार्ता, मिरज साहित्यसंमेलनांतील संमत-ठराव इत्यादि.

अनुक्रमणिका



महाराष्ट्र साहित्य परिषदेचें त्रैमासिक मुखपत्र

# महाराष्ट्र साहित्य पत्रिका

संपादक : वा. रा. ढवळे

संपादक – मंडळ
भ. श्री. पंडित
वा. ल. कुलकर्णी
अरविन्द मंगरूळकर
भगवन्त देशमुख

वर्ष ३३, अंक १२९ एप्रिल–मे–जून १९५९

## या अंकांत


| लेखक | | पृष्ठ |
|---|---|---|
| | संपादकीय ... ... ... | १ |
| प्रा. कृ. मो. शेंबवणेकर ... | शकार्थावर अभिनव प्रकाश... ... | ५ |
| डॉ. र. वि. हेरवाडकर ... | बखरींतील विभक्तिप्रत्ययप्रक्रिया ( भारत इतिहास संशोधक मंडळ पुणें या संस्थेच्या ४६ व्या वार्षिक संमेलनांत वाचलेला निबंध. ) .... | १३ |
| प्रा. पंडित आवळीकर ... | मुक्तेश्वरावर प्रकाश ... ... | १९ |
| डॉ. गं. ब. ग्रामोपाध्ये ... | भाषेचें व्याकरण व शुद्धाशुद्धविवेक ... | २८ |
| | साहित्य–समीक्षा ... .... | ३७ |
| | परिषद्वार्ता ... .... ... | ४१ |
| | मिरज मराठी साहित्य संमेलनांत संमत झालेले ठराव .... .... | १–७ |


संपादकीय
पत्रव्यवहाराचा पत्ता :
१२६ डी. फणसवाडी, मुंबई २.

महाराष्ट्र साहित्य परिषद्,
टिळक रस्ता, सदाशिव पेठ, पुणें २.

महाराष्ट्र साहित्य परिषदेचें त्रैमासिक मुखपत्र

महाराष्ट्र
साहित्य
पत्रिका

संपादक : वा. रा. ढवळे

वर्ष ३३, अंक १२९ एप्रिल–मे–जून १९५९

# संपादकीय

## मिरजेचें मराठी साहित्य संमेलन

मिरज येथे मे १९५९ च्या १६ ते १९ या दिवशीं मराठी साहित्य संमेलनाचें ४१ वें अधिवेशन प्रा. श्री. के. क्षीरसागर यांच्या अध्यक्षतेने साजरें झालें. मिरज साहित्य-संमेलनाच्या सूत्रचालकांनी गेल्या वर्षीं मुद्दाम मालवणला येऊन संमेलनाचें निमंत्रण आवर्जून दिलें होतें. तें देतांना त्यांनी ज्या अपेक्षा निर्माण केल्या होत्या त्या विफल ठरल्या; किंबहुना संमेलनाच्या चालकांचें सर्वसाधारण धोरण व तेथे दिसून आलेली गैरव्यवस्था यामुळे साहित्य संमेलनांच्या अधिवेशनांबद्दल एकंदरींत लोकांच्या मनांत गैरसमज निर्माण होण्यास मदतच झाली, असें दिसून आलें. अध्यक्षांपासून, खास निमंत्रणें देऊन बोलावण्यांत आलेल्या भूतपूर्व अध्यक्षांपर्यंत, बहुतेक सर्व माननीयांची जी उपेक्षा झाली त्याचीं कारणें कांहीहि असलीं तरी एकंदरींत साहित्य संमेलनावर साहित्यापेक्षा साहित्यबाह्य मूल्यांचा वरचष्मा दिसून आला. म्हणूनच संमेलनांच्या या असल्या अधिवेशनांचा गंभीरपणाने विचार करण्याची वेळ आली आहे. हीं संमेलनें भरविण्याच्या बाबतींत साहित्य परिषदेचें कार्यालय मार्गदर्शन करीत असतें हें खरें आहे; पण हें मार्गदर्शन मानलेंच पाहिजे असें जोंपर्यंत त्या संमेलनाच्या चालकांवर कोणत्याहि प्रकारचें बंधन नाहीं, तोंपर्यंत या मार्गदर्शनाला फारसा अर्थ उरत नाही, अर्थात्, हीं संमेलनें सुव्यवस्थित रीतीने भरण्याच्या कामीं या दृष्टीने परिषदेने त्यांत अधिक लक्ष घातलें पाहिजे असें अनेकांच्या बोलण्यांत आलें; आणि त्यांच्या म्हणण्यांत अर्थ आहे, हें मान्य करायला हवें.

## संमेलनाध्यक्षांचें भाषण

स्वागताध्यक्षांचें भाषण अपेक्षेपेक्षा लांबल्यामुळे, अध्यक्षांची थोडीफार कुचंबणाच झाली. अर्थात्, लिहिलेलें सर्व भाषण संमेलनांत त्यांना वाचतां आलें नाही; पण त्यांचें छापील भाषण

विचारांत घेतलें तर त्यांनी अत्यंत तळमळीने मराठी भाषिक प्रांत निर्माण न केल्यामुळे मराठी भाषिकांना झालेल्या अन्यायापासून मराठींतील वाङ्मयीन व बौद्धिक जीवनाला त्यांच्या दृष्टीने जडलेल्या रोगापर्यंतच्या अनेक प्रश्नांचा ऊहापोह केलेला आहे हें दिसून येतें. बेळगांवच्या साहित्य संमेलनःपासून भाषिक ऐक्याचा प्रश्न तळमळीने नि आवेशाने त्यानंतरच्या संमेलनां-ध्यक्षांनी विचारांत घेतलेला दिसून येतो. अर्थात्, या भाषिक प्रश्नाकडे व पर्यायाने भाषिक लढयाकडे पाहण्याची साहित्यभक्तांची दृष्टि राजकारणी लोकांपेक्षा कशी अधिक शुद्ध, सुस्पष्ट, सुसंगत अतएव वेगळी आहे, हें प्रा. क्षीरसागरांनी आपल्या तर्कशुद्ध विचारसरणीने व सुललित भाषापद्धतीने अत्यंत परिणामकारक रीतीने आपल्या भाषणांत मांडलें आहे. त्या दृष्टीने "हा प्रश्न केवळ प्रांतिक मुलुखगिरीपासून बचाव करण्याचा नसून राष्ट्रनिर्मितीचें भाषारूप हत्यार जतन करण्याचा, पाजळण्याचा व चातुर्याने वापरण्याचा आहे. या विधायक दृष्टीने भाषिक प्रांत-रचनेकडे पाहिलें तर आजचे सरहद्दीचे आणि राजधान्यांचे तंटे पुष्कळसे टळतील" हा प्रा. क्षीरसागरांचा इशारा चिन्त्य आहे. त्याचप्रमाणे इतर प्रांतांना त्यांच्या न्याय्य वांट्याचें आहे तें देऊन आजच्या सरकारने मराठी भाषिकांना तेवढें सवतीच्या पोरासारखें वागविलें, हें मराठी भाषिकांचें दुःख त्यांनी साहित्य संमेलनाच्या वेशीवर पुन्हा एकदा निःसंदिग्ध शब्दांत टांगलें आहे, याबद्दल क्षीरसागर धन्यवादास पात्र आहेत.

आजच्या बौद्धिक व वाङ्मयीन जीवनाला जडलेल्या रोगाचें निदान करतांना परंपरेचा व घरंदाजपणाचा धिक्कार, एकांडेपणाचा व बकाली राहणीचा गौरव, स्वैरता आणि अराजक यांचें तत्त्वज्ञान, या गोष्टींचा त्यांनी उल्लेख केला आहे. मात्र पाश्चात्यांच्या वाङ्मयीन व बौद्धिक जीवनाचें वृथा अनुकरण करण्याच्या वृत्तींतूनच आपल्या जीवनांत व पर्यायाने आपल्या वाङ्मयांत अनेक दोष निर्माण झाले आहेत. किंबहुना पाश्चात्य रिवाज उचलणें म्हणजेच आधुनिक होणें होय अशी अनेकांची कल्पना झालेली आहे हा सामाजिक व वाङ्मयीन पाहणी करून त्यांनी काढलेला निष्कर्ष थोडासा एकांगी आहे असें म्हणावें लागतें. हा निष्कर्ष काढतांना, विशेषतः वाङ्मयाच्या बाबतींत तो काढतांना, नेमकें कोणतें वाङ्मय त्यांच्या डोळ्यापुढे आहे हें स्पष्ट झालें असतें तर त्यांचें विधान तपासून घ्यायला मदतच झाली असती. ज्या वाङ्मयाकडे गुप्त समाजरोगाचें दृश्य लक्षण म्हणून क्षीरसागर पाहतात त्या वाङ्मयाचा निश्चित उल्लेख त्यांनी केला असता, तर सामान्य वाचकाला निःसंशय अधिक स्पष्ट मार्गदर्शन होऊं शकलें असतें. आजच्या वाङ्मयासंबंधी त्यांचीं पुढील मतें पाहावीं.

" आजच्या असात्त्विक आणि उथळ युगांत ज्याच्या मुळाशीं मूळचा मधुर पण दग्ध झालेला आशावाद नाही असा एक स्वयंभू, उनाड, चैनी निराशावाद निघाला आहे..... कशावरहि प्रेम नसतां नैराश्याचीं गीतें गाणें, कुठल्याच उच्च आदर्शाची ओढ नसतां जुने आदर्श ओढून काढणें, सौन्दर्याची प्रेरणा नसतांच काव्यनिवृत्तीला प्रवृत्त होणें हें आजच्या एका वाङ्मयांत संप्रदायाचें खास लक्षण आहे. या संप्रदायांत सौन्दर्याचा अभाव आहे असें नव्हे, तर सौन्दर्याच्या आकांक्षेचाच अभाव आहे. जुगुप्सा ही या संप्रदायाची प्रेरणा आहे, तर औचित्यभंग हें त्याचें सवंग आणि ग्राम्य असें तंत्र आहे.....जीवनांतील सौन्दर्य, अर्थ व औचित्य यासंबंधीच ज्यांना अश्रद्धा उत्पन्न झाली आहे आणि त्या अश्रद्धेमुळेहि विषाद न वाटतां ज्यांना एक प्रकारचा अमंगल उत्साह वाटत आहे, त्यांचें वाङ्मय सौन्दर्यशून्य, अर्थशून्य आणि बीभत्स न झालें तरच नवल ! "

हीं व अशाच प्रकारचीं इतर मतें मांडतांना त्यांनी या वाङ्मयसंप्रदायाचा निःसंदिग्ध उल्लेख केला असता व त्या संप्रदायांतील ललितकृतींचा नामोच्चार केला असता, तर त्यांचीं

विधानें पडताळून घ्यायला सोपें झालें असतें. त्या संप्रदायाचें त्यांनीं जें अन्यत्र परीक्षण केलें त्याचा निर्वाळा देऊन मोकळें होण्यापेक्षा अध्यक्षीय भाषणांतच त्यांचा नामनिर्देश त्यांनी केला असता तर वाङ्मयाच्या सर्वसामान्य वाचकाला त्यांच्या विधानांचें प्रत्यंतर मिळून मार्गदर्शन होऊं शकलें असतें. त्याचप्रमाणे त्या वाङ्मयाला शुद्ध वाङ्मयीन मूल्यांचा त्यांनी निकष लाविला आहे की सामाजिक मूल्यांचा लाविला आहे हेंहि आपोआपच उघड झालें असतें. क्षीरसागरांचीं पुढील विधानेंहि अशींच ठोकळेबाज वाटतात. "जुनें ठरण्याच्या भीतीबरोबरच नवनिर्मितीच्या चुकीच्या कल्पनाहि आज जीवनांत व कलेंत अराजक माजवीत आहेत. नवा अनुभव व तो व्यक्त करण्याकरिता नवा वाङ्मयप्रकार हा आजचा नव संकल्प होऊन बसला आहे. या नावीन्याच्या वेडाचें पर्यवसान म्हणजे अनुभूतिग्रहणाचें आणि अनुभूति-चित्रणाचें साधन 'हृदया' ऐवजी 'मेंदू' बनणें हें होय. अनुभवाशीं तादात्म्य पावण्याऐवजी त्याचें विश्लेषण करण्याने आणि तेंहि एखाद्या पुस्तकी सिद्धान्तानुसार करण्याने जीवनाचा गाभा हातीं लागेल ही आजच्या नवसंप्रदायाची कल्पना आहे; आणि वाचकांचें हृदय आकर्ष-कतेने काबीज करण्याऐवजी विपरीततेने प्रक्षुब्ध करणें हें अभिव्यक्तीच्या नावीन्यामागचें सूत्र आहे." ललित कृतींच्या निश्चित निर्देशाच्या अभावीं हीं सर्व विधानें मोंगळ वाटतात, अमूर्त (abstract) वाटतात. जीवनांत व कलेंत निश्चित कोणतें अराजक माजलें आहे हें टीकाकार या नात्याने प्रा. क्षीरसागरांनी सांगावें अशी जी श्रोत्यांची अपेक्षा होती ती सफल झाली नाही. नवसंप्रदायी लोकांच्या भात्यांतील बाणांना ते कचरेतील इतके क्षीरसागर लेच्या-पेच्या मनाचे नाहीत हें मी जाणतों; पण यच्चयावत् नवीन सर्व वाङ्मय हें वरील दोषांनी लिबाडलेलें आहें असें जेव्हा विधान ते करतात, त्या वेळीं तें सोदाहरण सिद्ध करण्याची जबाबदारी टीकाकार या नात्याने त्यांच्यावर साहजिक येऊन पडते हें विसरून चालणार नाहीं; किंबहुना साहित्य संमेलनाच्या अध्यक्षीय व्यासपीठावरून ज्या वेळीं हीं विधानें उच्चारलीं जातात त्या वेळीं त्यांचें समर्थन तर अधिक आवश्यक वाटतें. आजच्या वाङ्मयावर दोषारोप करतांना किंवा 'नव्या वाङ्मयाकडे आणि वाङ्मयटीकेकडे पाहिलें म्हणजे जणू प्रयोग करणें, धक्का देणें, आणि अन्तर्मनाचें विश्लेषण करणें, यांखेरीज वाङ्मयाला प्रयोजन नाहीं' असें म्हणतांना क्षीरसागरांनी नेमकें कोणतें वाङ्मय व वाङ्मयटीका असें करीत आहेत हें निर्भयपणाने सांगितलें असतें तर त्या वाङ्मयाच्या बाबतींत योग्य ती खबरदारी घेणें सोयीचें झालें असतें. आपल्या भाषणांत त्यांनी राष्ट्रभाषा, द्वैभाषिक का हिंदी भाषिक, नियोजनाचें स्तोम, इंग्रजीसंबंधीची लाचारी, शब्दांच्या टांकसाळी, शास्त्रीय परिभाषा वगैरे अनेक प्रश्नांची जी जातां जातां चर्चा केली आहे ती न करतां आजच्या वाङ्मयाला प्रयोजनच कसें उरलेलें नाही या प्रश्नाच्या साधार चर्चेला तीं पानें वाहिलीं असतीं, तर क्षीरसागरांचें भाषण अधिक एकसंध व अधिक परिणामकारक झालें असतें असें मला वाटतें.

## मराठवाड्याच्या मराठीचा आधार गेला !

मराठवाड्यांतील मराठीचे विद्वान् प्राध्यापक व मराठवाड्यांतील लोकवाङ्मयाचे भाष्यकार व निष्ठावन्त उपासक डॉ० नारायणराव नांदापूरकर यांना जून ता. ९ ला वयाच्या साठाव्या वर्षी हृदयविकाराच्या झटक्याने मृत्यु आला व केवळ मराठवाडा नव्हे, तर अखिल महाराष्ट्र एका थोर साहित्यिकाला मुकला. गेलीं तीस-पस्तीस वर्षे डॉ. नांदापूरकरांनी मराठी भाषेची केलेली विविध सेवा लक्षांत घेतली व विशेषतः ज्या प्रतिकूल परिस्थितींत ती त्यांनी केली ती परिस्थिति लक्षांत आणली तर त्यांच्या सेवेचें अनन्यसाधारणत्व जाणवल्याशिवाय

राहत नाही. नांदापूरकर दोन–अडीच वर्षांपूर्वी उस्मानिया विद्यापीठाच्या मराठी विभागाचे प्रमुख म्हणून सेवानिवृत्त झाले असले तरी आपल्या अंगीकृत वाङ्मयकार्यातून ते निवृत्त झालेले नव्हते. मराठवाड्यांतील जीवनाशीं ते इतके समरस झालेले होते की त्या प्रांतांतील लोकगीतें, स्त्रीगीतें, म्हणी वगैरे मोठ्या कष्टाने गोळा करून त्या प्रांतांतील खेडुत जीवनाचें दर्शन ते मराठी वाचकांना घडवीत होते. माहेरचें मराठी, मराठीचा मोहोर, मराठीची माया वगैरे त्यांचे संग्रह म्हणजे खेड्यांतील सांस्कृतिक जीवनाचे आरसेच म्हटले पाहिजेत. परळी येथे भरलेल्या मराठवाडा साहित्य संमेलनाच्या अध्यक्षपदावरून त्यांनी ' ओवी ' या वाङ्मय-प्रकाराचें केलेलें विवेचन त्यांच्या काव्याभ्यासाचें निदर्शक आहे. आपल्या त्या अध्यक्षीय भाषणांत त्यांनी लोकवाङ्मयाचें व विशेषत: स्त्रीगीतें व ओवी या वाङ्मयप्रकारांचें सुरस नि सुबोध विवेचन केलें होतें. त्या भाषणासंबंधीं मीं त्या वेळीं पुढीलप्रमाणे लिहिलें होतें—

" हें गद्यकाव्य आहे असा संभ्रम पाडणारें हें संशोधनात्मक लेखन आहे. डॉ. नांदापूरकरांचा हा भाषाविलास म्हणजे त्यांच्या काव्यात्म वृत्तीचा जसा आविष्कार आहे, त्याचप्रमाणे स्त्रीगीतांच्या स्वरूपाचें हें वर्णन त्यांच्या संशोधनाचा परिपाक आहे. कवीला बहुधा न जमणारें संशोधन व संशोधकाला सहसा साध्य न होणारा भाषाविलास हीं एकत्र न येणारीं वैशिष्ट्यें डॉ. नांदापूरकरांच्या ठिकाणीं आढळून येतात. म्हणूनच त्यांचें हें भाषण विशेष उल्लेखनीय वाटतें. मराठी वाङ्मयाचा व विशेषतः लोकवाङ्मयाचा अभ्यास करणारांना त्याची उपयुक्तता विशेष आहे. "( म. सा. पत्रिका, वर्ष २९, अंक ११५, इ. स. १९५५ )

डॉ. नांदापूरकर यांनी ' वाग्विलास ' या काव्यसंग्रहाने साहित्यक्षेत्रांत एक सत्कवि म्हणून जरी प्रवेश केला असला, तरी भाषेचा इतिहास व जुन्या संत व पंडित कवींच्या काव्याचा अभ्यास यांच्याकडेच त्यांनी आपल्या वाङ्मयसाधनेचा ओघ पुढील काळांत वळविला. ' मुक्त मयूरांचीं भारतें ' या प्रबंधाला नागपूर विद्यापीठाने त्यांना डॉक्टरेटची पदवी दिली. ' जनाबाई व मुक्तेश्वर ', ' एकनाथी भारुडें ' वगैरे विषयांवरहि त्यांनी संशोधनात्मक दीर्घ प्रबंध लिहिलेले आहेत. मराठवाड्यांतील बोलींचा व बोलभाषेंतील म्हणींचा त्यांचा अभ्यास किती सूक्ष्म होता हें त्यांच्या ' मायबोलीची कहाणी ' या पुस्तकांत आढळून येतें.

स्वतःच्या लेखनाप्रमाणेच मराठवाड्यांतील इतर अनेक लेखकांना लेखनाची व अभ्यासाची प्रेरणा ते सुरुवातीपासून देत आले हें त्यांचें कार्य कमी महत्त्वाचें नाही. मराठवाडा साहित्य परिषदेच्या कार्यात ते आस्थापूर्वक लक्ष घालीत असत. ' प्रतिष्ठान ' या मासिकाचे सुरुवातीला तीन वर्षे ते संपादक होते व पुढेहि त्यांचें त्या मासिकाला मार्गदर्शन मिळत होतेंच. त्यांच्या वाङ्मयसेवेचें महत्त्व ओळखून मुंबई मराठी ग्रंथसंग्रहालयाने त्यांना वार्षिकोत्सवाचे अध्यक्ष म्हणून बोलाविलें होतें.

गेलीं चार–पांच वर्षे त्यांना हृदयविकाराची व्यथा जडल्यामुळे ते हैद्राबाद सोडून सहसा कुठे बाहेर जात नसत. त्या विकारावर ते मात करूं शकले नाहीत. त्यांच्या निधनाने मराठवाड्याच्या मराठीचा एक आधारच गेला आहे यांत शंका नाही.

### मध्यप्रदेश साहित्य परिषद्

मध्यप्रदेशांतील इंदूर, जबलपूर, भोपाळ, ग्वाल्हेर वगैरे ठिकाणीं असलेल्या साहित्य संस्थांच्या धोरणांत व कार्यांत एकसूत्रीपणा आणण्याच्या दृष्टीने मध्यप्रदेश साहित्य परिषद् या

( पुढील मजकूर पान ४४ वर पाहा. )

प्रा. कृ. मो. शेंवडणेकर

# शकार्थावर अभिनव प्रकाश

शालिवाहन किंवा सातवाहन राजाने जी वर्षगणनापद्धति सुरू केली, व जिचा पुरस्कार आपल्या भारत सरकारने नुकताच केला, तीस ' शक ' ही संज्ञा कां प्राप्त झाली हा एक ऐतिहासिक कूटप्रश्न होऊन बसला आहे. कारण प्राचीन भारतीय वाङ्मयांत ' शक ' हा शब्द बहुधा एका म्लेच्छ जातीचा निर्देश करण्याकरिता उपयोजिलेला आढळतो. मनुस्मृतींत व इतरत्रहि ' काम्बोजा यवनाः शकाः ' वगैरे अनेक म्लेच्छसंघ भारतीयांचे शेजारी किंवा वैरी म्हणून प्रसिद्ध होते हें स्पष्टपणें सांगितलें आहे. त्याचबरोबर युधिष्ठिरादि राजांनी सुरू केलेल्या वर्षगणनापद्धतीस ' शक ' ही संज्ञा दिल्यामुळे आपल्या ज्योतिःशास्त्रांत, आणि विशेषतः आपल्या हिंदु पंचांगांत, त्या शब्दाचा अर्थ ' सन ' ह्या अरबी शब्दाशीं किंवा era ह्या इंग्रजी शब्दाशीं, तंतोतंत जुळता झाला आहे. अर्थात्, हे दोन शब्द मूलतः आणि तत्त्वतः परस्परांहून भिन्न आहेत, की एकाच्या अनुरोधामुळे किंवा संबंधामुळे दुसरा प्रचारांत आला, हें त्या कूटप्रश्नाचें बीज आहे. सर्वहि प्रौढ भाषांमध्ये वर्णसाम्य असतांहि परस्परविभिन्न असे कांही शब्द असतातच. उदाहरण, Well म्हणजे विहीर, आणि Well म्हणजे ठीक, हे दोन शब्द अगदी भिन्न आहेत. त्याचप्रमाणे मराठींत ' पाट ' म्हणजे बसण्याकरिता केलेली लाकडी बैठक आणि ' पाट ' म्हणजे पाणी नेण्याकरिता खणलेली पन्हळी, हेहि तसेच परस्परविभिन्न शब्द आहेत. कालगणनापद्धतीचा वाचक ' शक ' हा शब्द म्लेच्छजातीय शकांपासून आलेला नसून तो त्यांपासून कसा अगदी स्वतंत्र आहे, आणि त्या दोन शब्दांमधील वर्णसाम्य कसें यदृच्छाप्राप्त आहे, हें प्रस्तुत लेखांत ऐतिहासिक प्रमाणांनी सिद्ध करावयाचें आहे.

प्रस्तुत ऐतिहासिक समस्या सोडविण्याकरिता गेल्या पन्नास पाऊणशे वर्षांत पुष्कळ विद्वानांनी पुष्कळ प्रयत्न करून जो निर्णय काढला त्याचा निष्कर्ष असा : ' शक ' अथवा सिथियन लोक पश्चिम भारतांत खिस्ती सनाच्या प्रारंभींच्या शतकांत सत्ताधीश होते आणि काश्मीर व पंजाब वगैरे भागांतहि त्यांचीं राज्यें त्या काळीं होतीं असें राजतरंगिणीवरून व इतर ऐतिहासिक पुराव्यावरून सिद्ध होतें. शालिवाहनाच्या नांवाने आज प्रचलित असलेल्या वर्षगणनापद्धतीचा प्रारंभहि त्याच सुमारास झाला असल्यामुळे, हा शक संवत्सर त्या परकीय लोकांनीच भारतीयांस सादर अर्पण केला, आणि ते लोक नष्ट होऊन गेले तरी भारतीयांनी त्यांची स्मृति आजवर त्या शब्दाचा संस्कृत शब्द म्हणून उपयोग करून, कृतज्ञतेने अथवा प्रमादाने जतन करून कायम ठेवली. अर्थात्, प्रस्तुत शब्द मूळचा म्लेच्छजातीय लोकांचा वाचक असतांहि त्याचा लोकव्यवहारामध्ये घनिष्ठ संबंध आल्यामुळे संस्कृत भाषेंतहि त्याचा यौगिक अर्थाने अंतर्भाव झाल्यास नवल नाही. युरोपियन पंडित व इतिहासकार तर भारतीय संस्कृतींत जेवढें म्हणून संग्राह्य किंवा स्पृहणीय आहे तेवढ्याचें जनकत्व प्राचीन ग्रीक संस्कृतींत शोधून काढण्याकरिता बद्धपरिकर झाले होते हें आतां सर्वश्रुतच आहे. याच्या उलट, बहुतेक

सर्व भारतीय लेखक व संशोधक त्यांचे मिंधे बनून त्यांच्या मतांना कांहीं वेळां अनाठायींहि मान तुकवीत आले आहेत हेंहि तितकेंच प्रसिद्ध आहे. शालिवाहनाच्या नांवाने सुरू असलेला ' शक ' ग्रीक लोकांपासून आलेला नसला तरी निदान तो बाहेरच्या लोकांपासूनच भारतीयांस प्राप्त झाला हें ठरविण्यांत पाश्चात्य लेखकांस अंशतः तरी भूषण होतें. शक शब्द केवळ संज्ञावाचक म्हणून प्रारंभीं उपयोजिला गेल्यामुळे अमरादि कोशांत त्याचा अंतर्भाव झाला नाही. जर त्याचा वर्गवाचक शब्द म्हणून व्यवहारांत प्रचार असता तर त्याचा अंतर्भाव नक्की झाला असता, मग त्याचें उत्पत्तिस्थान कोणतेंहि असो. शक संवत् कोणीं प्रचलित केला, त्याचा वायव्य प्रांतांतसुद्धा पूर्वकाळीं कसा प्रचार झाला, आणि दक्षिणेंतील शिलालेखांतहि प्रसंगवशात् त्याचा निर्देश ' शकनृपतिकाल ' किंवा अशासारख्या अन्य शब्दांनी कां व कसा केला गेला, तें पाहणें फार महत्त्वाचें असलें, तरी प्रथमत: एका मान्यवर व प्रथितयश अशा मराठी लेखकाची एक नजरचूक येथे दाखविणें जरूर आहे. कै. शंकर बाळकृष्ण दीक्षितांच्या तोडीचा भारतीय ज्योतिःशास्त्रावर प्रमाणभूत ग्रंथ लिहिणारा लेखक महाराष्ट्रांत तर नाहीच, पण अखिल भारतांतहि क्वचितच झाला असेल; आणि त्यांच्या ग्रंथाचा व पर्यायाने ग्रंथकाराचा, जो गौरव झाला व होत आहे त्याचा महाराष्ट्राला केव्हांहि अभिमानच वाटेल.

कै. दीक्षितांनी ' शककाल ' शकजातीय म्लेच्छ राजांनी प्रचारांत आणला असावा हें अनुमान ग्राह्यकोटींत बसविलें आहे. ते म्हणतात—" शक हा शब्द वस्तुत: कोणा एका जातीच्या लोकांचा वाचक आहे. विक्रमाने शक राजांचा पराभव केला; तेव्हापासून शक या नांवाने कालगणना सुरू केली असें भट्टोत्पल इत्यादिकांनी लिहिलें आहे. परंतु हें सयुक्तिक दिसत नाही. शक जातीच्याच राजांनी आपल्या नांवानेच कालगणना सुरू केली असावी." ×

कै. दीक्षितांचें हें मत आजपर्यंत सर्वमान्य असेंच समजलें जातें. तथापि ब्रह्मगुप्ताच्या ब्राह्मस्फुटसिद्धांतांतील एक वाक्य अथवा चरण त्यांच्या नजरेंतून सुटलेला दिसतो. कारण त्याचा उपन्यास किंवा चर्चा त्यांच्या ग्रंथांत मिळत नाही. तें वाक्य असें.—' त्रीणि शतादीनि कलेर्गोऽगैकगुणा: शकान्तेऽब्दा: । ' (ब्र. सि. Folio No 2*, 10). हें वाक्य शक शब्दावर एकदम नवा प्रकाश पाडतें. ह्या आर्यार्धांतील ' त्रीणि शतादीनि ' हीं दोन पदें पूर्वार्धाशीं संबद्ध आहेत; आणि राहिलेल्या पदांचा अर्थ असा:—" कलियुगाचीं शकाच्या अंतीं ३१७९ वर्षें होतात. " आतां ज्या शकाच्या शेवटीं इतकीं वर्षें भरतात तो शक कोणाचा हा प्रश्न उपस्थित होतो, आणि त्याजबरोबर शक शब्दाचा अर्थहि निश्चित करण्याची जबाबदारी पडते. कारण, हें एकच वाक्य ज्योतिषग्रंथांत असें मिळतें की जें निर्णायक स्वरूपाचें ठरेल.

कलियुगाच्या प्रारंभापासून ज्याचा ' शक ' सुरू होता तो राजा म्हणजे युधिष्ठिर हें निर्विवाद आहे. तो पहिला शककर्ता होता अशी ग्वाही आपल्या पंचांगकारांनीच काय, पण अल्बेरुणी वगैरे परकीय लेखकांनीसुद्धा एक हजार वर्षांपूर्वी स्पष्ट दिलेली आढळते. त्याचप्रमाणे तो ' शक ' ३१७९ वर्षें चालून नंतर दुसरा प्रचारांत आला असा आपल्या ज्योतिषग्रंथकारांचा सिद्धान्त आहे. येथें एक गोष्ट सांगितली पाहिजे की, कलियुगाच्या प्रारंभाविषयी जरी आपल्या ज्योतिष्यांची एकवाक्यता होती तरी युधिष्ठिर राजा कलियुगाच्या बरोबर प्रारंभीं, म्हणजे द्वापारयुगाच्या शेवटीं, झाला की कलियुगाचीं कांहीं वर्षें गेल्यावर झाला

× भा. ज्यो. प्र. आ. पृ. ३७१.

* ब्रह्मसिद्धान्त बॉम्बे युनिव्हर्सिटीच्या लायब्ररींत पोथीच्या रूपांत आहे.

ह्याविषयीं मतभेद होता. आर्यभट्ट, ब्रह्मगुप्त वगैरे ग्रंथकारांच्या मतें तो बरोबर प्रारंभींच होता, आणि त्यामुळे त्याच्या शकाची समाप्ति ३१७९ वर्षांनी झाली. याच्या उलट, वराहमिहिराच्या व दुसऱ्या कित्येकांच्या मतें कलियुगाचीं ६५३ वर्षे गेल्यावर कौरव-पांडव झाले. प्रसिद्ध इतिहासकार कल्हण आपल्या राजतरंगिणींत स्पष्टच सांगतोः—'शतेषु षट्सु सार्धेषु त्र्यधिकेषु च भूतले । कलेर्गतेषु वर्षाणामभूवन्कुरुपाण्डवाः ॥' आणि त्यामुळे युधिष्ठिराचा शककाल ३१७९–६५३=२५२६ इतका भरतो. वराहमिहिराने तर स्पष्ट शब्दांत सांगितलें आहे की 'षड्द्विकपञ्चद्वियुतः शककालस्तस्य राज्ञश्च ।' कै. दीक्षितांनी वराहमिहिराच्या प्रस्तुत वाक्याचा अर्थ टीकाकाराच्या अनुरोधाने केल्यामुळे थोडा घोटाळा उत्पन्न झाला आहे. कै. जनार्दन हरि आठल्ये यांनीहि तसाच अर्थ आपल्या बृहत्संहितेच्या भाषांतरांत केला आहे. टीकाकार उत्पल वराहमिहिराच्या प्रस्तुत आर्येचें विवरण करतांना म्हणतो की 'शककालांत, म्हणजे विक्रमशकांत (किंवा शालिवाहन शकांत) २५२६ वर्षे मिळविलीं म्हणजे युधिष्ठिराचा काल मिळतो.' जणू काय युधिष्ठिर राजा केव्हा होऊन गेला हें ग्रंथकारास सांगावयाचें होतें. असा अर्थ केल्यास युधिष्ठिरशक म्हणून कांही चीज अस्तित्वांत नव्हती असें ठरतें; परंतु असा अर्थ करणें युक्त आहे की अयुक्त आहे हें सध्या बाजूस ठेवून युधिष्ठिराच्या कालगणनेसच 'शक' ही संज्ञा होती, हें ब्रह्मगुप्ताच्या वरील वाक्यावरून कसें निःसंदिग्ध ठरतें तें दाखवितों.

'शकान्ते' ह्या सप्तम्यंत पदावरून एका कालगणनेचा अंत निश्चित झाल्याचें स्पष्ट दिसतें. वर्षसंख्या ३१७९ ही त्या कालगणनेचा अवधि दाखविते, आणि त्या कालगणनेस 'शक' ही संज्ञा होती हेंहि त्याजबरोबर सिद्ध होतें. जर ती तशी नसती तर निरुपपद 'शक' हें पद घालणें सर्वथा अनुचित झालें असतें. हाच अर्थ दुसऱ्या शब्दांत सांगावयाचा झाल्यास, कोणीहि समंजस ग्रंथकार पूर्वी अनुपलब्ध असलेल्या, आणि केवळ स्वतःच्या काळीं उपलब्ध असलेल्या, संज्ञेने पूर्वीच्या कालगणनेचा निर्देश करूं पाहील तर तो निरुपपद शब्दप्रयोग करणार नाही. उदाहरणार्थ, बाणभट्टाच्या प्रसिद्ध कथेची 'कादंबरी' ही संज्ञा नसती, आणि पुढे केव्हातरी रूढ झालेल्या कादंबरी शब्दाने तिचा निर्देश करण्याचें कोणीं मनांत आणलें असतें, तर त्या माणसाला 'कादंबरींत' असा उल्लेख करणें शक्य झालें नसतें. 'बाणाच्या कादंबरींत' असें म्हणणें अपरिहार्य झालें असतें. अर्थात्, युधिष्ठिराच्या कालगणनेस 'शक' ही संज्ञा होती. ब्रह्मगुप्ताचा उद्देश आपल्या कालापर्यंत व्यतीत झालेला अवधि दाखविण्याचा नाही हें अगदी उघड व सर्वमान्य आहे; आणि ज्या अर्थी तो शक युधिष्ठिराच्या नांवाशीं संबद्ध होता, त्या अर्थी म्लेच्छजातीय शकांपासून तो शब्द आलेला नव्हे हेंहि आपोआपच सिद्ध होतें. कारण तो चंद्रवंशभूषण नृपति विक्रमादित्याप्रमाणे 'शकारि' म्हणूनहि लोकविश्रुत नाही. ह्या सर्व विवेचनावरून ते शब्द वर्णसाम्य असतांहि परस्परभिन्न होत असें ठरतें.

आता वराहमिहिराच्या वाक्याचा अर्थ सरळ असतांहि उत्पलाने निर्मित केलेल्या आभासामुळे कसा अस्वाभाविक होतो तें दाखविणें जरूर आहे. '२५२६ वर्षे हा त्या राजाचा शककाल होय' हें वराहमिहिर व त्याचा अनुयायी राजतरंगिणीकार कल्हण, ह्या दोहोंचेंहि कसें मत होतें तें पूर्वी दाखविलेंच आहे. 'तस्य राज्ञः' ह्या षष्ठ्यंत पदांचा संबंध त्याच आर्येंतील व त्याच पदांच्यापुढे असलेल्या 'शककालः' ह्या पदाशीं अगदी स्वाभाविकपणें जातो हें उघड आहे. असें असतां 'शककालांत २५२६ वर्षे मिळविल्यावर त्या राजाचा काल येतो' हा अर्थ खरोखर क्लिष्ट व वक्र आहे. कारण, असा अर्थ केल्यास निष्कारण 'कालः' ह्या शब्दाचा अध्याहार घ्यावा लागतो. जेथे अर्थसंगति नीट जमत नसेल तेथेच अध्याहार

द्यावायचा असतो. शिवाय, युधिष्ठिराचा काल काढावयाचा, तर विक्रमशकांत किती वर्षे भरीस घालावीं लागतात हें सांगण्याचा ग्रंथकाराचा उद्देश होता असेंहि संदर्भावरून दिसत नाही. एका महामतीने तर 'षड्द्विकपंचद्वियुत:' ह्या समासांतील 'युत:' हा शेवटचा शब्द नेहमी मिळवणी किंवा बेरीज दाखविणारा असल्यामुळे तसा अर्थ करावा लागतो अशी आणखी वर मल्लिनाथी केली आहे! परंतु गणितांत जरी 'युत' शब्दाचा अर्थ तसा होत असला तरी इतरत्र त्याच शब्दाचा अर्थ 'बनलेला', 'जुळलेला', (सं. घटित, निबद्ध) असा होत असतो हें त्याला माहीत नसावें असें दिसतें. उदाहरणार्थ, 'रैश्चतुभिर्युता स्रग्विणी संमता।' 'त्रिमुनियतियुता स्रग्धरा कीर्तितेयम्।' इत्यादि लक्षणवाक्यांत अमुक अमुक गणांनी जुळलेली असाच सरळ अर्थ अभिप्रेत आहे; आणि प्रस्तुत आर्येंतहि 'सहा, दोन, पांच, दोन ह्या अंकांनी बनलेला किंवा जुळलेला त्या राजाचा शककाल' हा अर्थ अधिक ग्राह्य होय. युधिष्ठिराच्या कालगणनेस 'शक' ही संज्ञा लागू नव्हती ह्या भ्रामक समजुतीमुळे वरील क्लिष्टार्थाचा उदय झाला हें उघड आहे. परंतु वरील विवेचनावरून त्या समजुतीचा व तिच्यामुळे उद्भवलेल्या क्लिष्टार्थाचाहि निरास होतो. क्षणभर असेंहि गृहीत धरूं कीं वराहमिहिराच्या मनांत तो क्लिष्टार्थच वसत होता. तर मग त्याने 'शककालस्तस्य राज्ञश्च' असें न म्हणतां 'शककालस्तस्य कालश्च।' असा चरण पुरा केला असता, आणि तसें करतांना छंदोभंगाची वगैरे कोणतीहि अडचण आली नसती.

वास्तविक पाहतां टीकाकार उत्पल काश्मिरी असल्यामुळे 'सप्तर्षिसंवत्' नामक एक कालगणना काश्मिरांत प्रचलित होती, आणि तिचा शककालाशीं समन्वय करावयाचा झाल्यास काय करावें लागतें, तें सांगण्यासाठी त्याने वरील आर्येचें विवरण करतांना बाहेरचा अर्थ आणखी तेथे सांगितला आहे. कै. पंडित दुर्गाप्रसादांनी 'युधिष्ठिर शक' असाच अर्थ केला आहे. 'युधिष्ठिरशकादौ.......केचिद् भारताहवकालं कलयन्ति।'* परंतु बाकी सर्वांनी उत्पलाच्या अर्थाचा अनुवाद केला आहे.

**उत्पलाचा भ्रम**

उत्पलभट्ट हा जरी ज्योतिश्शास्त्रावरील मान्यवर ग्रंथकार म्हणून प्रसिद्ध असला तरी बहुतेक सर्व प्राचीन ग्रंथकारांप्रमाणे ऐतिहासिक विषयांत तो अनभिज्ञच होता. त्यामुळे 'शककाल' विक्रमादित्याने स्थापिला हें त्याचें विधान निव्वळ भ्रांतिमूलक होय. संवत्वर्ष-गणनेचा संस्थापक विक्रमादित्य 'शकारि', म्हणजे शकांचा नि:पात करणारा म्हणून प्रसिद्ध होता, आणि त्यामुळे त्याचा वरीलप्रमाणे गैरसमज झाला असावा. प्राचीन पंडितांचे जरी कांही ऐतिहासिक गैरसमज असले तरी ते क्षम्य होत. त्यामुळे त्यांच्या योग्यतेस धक्का पोचत नाही. कारण, त्यांच्या काळीं भारतवर्षाचा इतिहास असा विषयच अस्तित्वांत नव्हता. मग त्याचें ज्ञान कोठून असणार? तथापि त्याने 'गतानि वर्षाणि शकेन्द्रकालात्' (बृ. सं. ८-२१) ह्या श्लोकांतील 'शकेन्द्रकाल' ह्या पदाचें केलेलें विवरण केवळ ऐतिहासिकदृष्ट्याच नव्हे, तर शब्दशास्त्रदृष्ट्याहि अत्यंत अग्राह्य ठरतें. शकांचा बीमोड करणारा म्हणून 'शकेन्द्र' ह्या माननीय पदवीस (!) चढणें ह्यापेक्षा अधिक दैवदुर्विपाक तो कोणता? ही व्युत्पत्ति मान्य केल्यास रावणारि रामचंद्रास त्याच्या भक्तजनांनी 'राक्षसेन्द्र'

* साहित्यदर्पण, नि. सा. उपोद्घात.

म्हणून गौरविलें तर कोठे चुकेल ? आणि मग कौरवांचा नि:पात करणारा भीमहि 'कौरवेन्द्र' ठरेल. परंतु असले शब्दप्रयोग निवळ कर्णदाहक होत. लक्षणेने श्रेष्ठ पुरुषांचें स्थानाशीं ऐकात्म्य होतें, कृतीशीं होतें; परंतु शत्रूशीं ऐकात्म्य झाल्याचें कोठेहि उदाहरण आढळत नाही. कै. दीक्षितांनी उत्पलाचें हें मत असमंजस असेंच धरलें आहे. परंतु 'शक जातीच्या राजांनी आपल्या नांवानेच कालगणना सुरू केली असावी' हें जें त्यांनी अनुमान केलें तें ब्रह्मगुप्ताचें वर उद्धृत केलेलें वचन त्यांच्या नजरेंतून सुटल्यामुळे केलें ह्यांत संशय नाही. नाहीतर त्या वाक्याचें महत्त्व त्यांच्या लक्षांत ताबडतोब आलें असतें. उत्पलाच्या वरील चुकीमुळे दुसऱ्या चुका कशा उद्भवल्या, आणि त्यामुळे वाक्यान्वयांतदेखील कसा क्लिष्टपणा आला तें आता दाखविणें जरूर आहे.

वर उल्लेखिलेल्या श्लोकांत 'शकेन्द्रकालात्' आणि 'शकभूपकालम्' अशीं दोन अनुक्रमें पंचम्यंत व द्वितीयान्त पदें आहेत, आणि उत्पलाच्या टीकाधारें सर्वांनी शकेन्द्र व शकभूप हे दोन्ही शब्द एकाच व्यक्तीचे, म्हणजे शकारीचे, वाचक असे धरून अर्थ केला आहे. त्या श्लोकांत अहर्गण काढण्याची रीति सांगितली आहे. आपणाला त्या रीतीशीं कांही कर्तव्य नसल्यामुळे केवळ त्या शब्दांची, किंवा त्यांच्या अर्थांची, कशी ओढाताण झाली आहे तेवढेंच पाहूं. त्याने पहिल्याचा, म्हणजे पंचम्यंत पदाचा, 'शकेन्द्रकालात्' = 'शकनृपवधादारभ्य' असा अर्थ केला आहे. परंतु जी कालगणना प्रचारांत आहे तिच्यापासून असें न म्हणतां तिचीं अमुक इतकीं वर्षें, असाच शब्दप्रयोग सर्व भाषांत आढळतो. उदाहरणार्थ, शालिवाहन शकापासून १८८० वर्षें असें न म्हणतां आपण शालिवाहन शकाचीं तितकीं वर्षें, असेंच म्हणतों. तर मग शकेन्द्र कोण हा प्रश्न पुढें उभा राहतो. त्याचें उत्तर युधिष्ठिर. शकसंज्ञक कालगणनेचा तो आद्य प्रवर्तक म्हणून वराहमिहिराने, किंबहुना त्याच्या पूर्ववर्ती ग्रंथकारांनी, त्याला ती संज्ञा दिली असा अर्थ घेतला म्हणजे वाक्यार्थ सुश्लिष्ट व सुसंगत ठरतो. शकेन्द्र कालापासून जितकीं वर्षें गेलीं त्यांना, म्हणजे युधिष्ठिरशक समाप्त झाला तेथपासून जितकीं वर्षें गेलीं त्यांना असा अर्थ घेतला म्हणज कोणतीहि अडचण येत नाही. इतकेंच नव्हे तर ग्रंथकाराचें कौशल्य—जें टीकाकाराच्या नजरेंत आलें नाही तें—प्रकट होतें. कारण, त्याला छंदोभंग न करितांहि 'शकारि' असें ( अर्थात् तो अर्थ विवक्षित असता तर ) सहज म्हणतां आलें असतें. कल्हणाने तर एके ठिकाणीं विक्रमादित्याचा (अर्थात् पहिल्या) 'शकारिर्विक्रमादित्य:' असाच उल्लेख केला आहे. उत्पलाने केलेला त्या शब्दाचा अर्थ, आणि हा आता प्रथम दाखविलेला अर्थ, गणितफलाच्या दृष्टीने सारखेच आहेत. युधिष्ठिरशकापासून, म्हणजे त्याच्या अंतापासून, जितकीं वर्षें गत होतात तितकींच शकवर्षगणनेच्या आरंभापासून होतात हें उघड आहे. परंतु फलितार्थ सारखा झाला म्हणून शब्दार्थ नेहमी बरोबर असतो असा नियम नाही; आणि टीकाकार किंवा भाषांतरकार चुकला म्हणून ग्रंथकार चुकला असेंहि होत नाही. वराहमिहिराने पंचमी विभक्ति बरोबर वापरली आहे. तोच 'शकेन्द्र' शब्द त्याने आपल्या पंचसिद्धांतिका नामक ग्रंथांतहि वापरला आहे. 'द्व्यूनं शकेन्द्रकालम् ..'इत्यादि ती आर्या आहे, आणि तिचा अर्थ पुढीलप्रमाणे आहे:- 'शकेन्द्रकालांत दोन वजा करून जी बाकी राहील तिला पांचांनी भागावें; आणि जो बाकी येईल तितक्या वर्षांचा अहर्गण माघशुक्लादी-पासून करावा.' येथेहि त्या शब्दाचा अर्थ वेगळा नाही. विशेष लक्षांत ठेवण्यासारखी गोष्ट ही की, प्रस्तुत आर्येंत सांगितलेली अहर्गण काढण्याची रीति मूळ पितामहसिद्धांतांतील आहे. तो सिद्धान्त आता अस्तित्वांत नाही. तथापि तो शालिवाहन शकापूर्वीचा होता असें कै. दीक्षितांनी सप्रमाण सिद्ध केलें आहे. जर शकसंज्ञक वर्षगणना शालिवाहनापूर्वीं किंवा १९००

अनुक्रमणिका

वर्षांपूर्वी अस्तित्वांत नव्हती, तर त्या काळाच्या पूर्वी लिहिल्या गेलेल्या ग्रंथांत शकेंद्राचा उल्लेख कसा आला ही शंका त्यांना अर्थातच आली. परंतु वराहमिहिराने पूर्वीच्या ग्रंथांतील वचनें किंवा गणितपद्धति सांगतांना आपल्या काळांतील परिभाषा घेणें असंभाव्य नाही असें म्हणून त्यांनी त्या शंकेचें समाधान केलें आहे. परंतु वर दाखविल्याप्रमाणे जर शकेंद्रकाल म्हणजे युधिष्ठिरशक धरला तर कोणतीच अडचण उपस्थित होत नाही. इतकेंच नव्हे तर, तोच धरणें अधिक सोइस्कर पडतें. याप्रमाणे शकेंद्र शब्दाचें हें नवीन अर्थदर्शन अत्यंत महत्त्वाचें आहे हें कोणीहि मान्य करील. आता ज्यांना एकदा अंगीकृत केलेले सिद्धान्त संशयातीत वाटतात त्यांना नवीन अर्थदर्शन केवळ असह्य होईल हें खरें आहे. 'तातस्य कूपोऽयमिति ब्रुवाणा क्षारं जलं कापुरुषा पिबन्ति।' हें सुभाषित प्रसिद्धच आहे. परंतु सत्य हें मानवी भावनांपेक्षा अत्यंत उदात्त आहे. कै. दीक्षितांनी केलेल्या महनीय कार्यांत अल्पांशाने भर टाकण्यांत अथवा दुरुस्ती करण्यांत प्रस्तुत लेखकाला बरेंचसें सात्त्विक समाधान वाटत आहे.

युधिष्ठिराने स्थापिलेल्या किंवा त्याच्या नांवाने प्रचलित केलेल्या वर्षगणनेचा ३१७९ वर्षांनी—किंवा मतांतराने २५२६ वर्षांनी—लोप झाला असें प्राचीन ज्यौतिष ग्रंथांवरून दिसतें. अर्थात्, त्यानंतर संवत् अथवा शकवर्षगणना सुरू झाली. सातवाहन वंश ख्रिस्ती शकाच्या पहिल्या शतकांत, म्हणजे सुमारें १९०० वर्षांपूर्वी, महाराष्ट्र आणि कुंतल म्हणजे कर्नाटक भागांत राज्यारूढ होता असें कथासरित्सागर, वात्स्यायनप्रणीत कामसूत्र वगैरे ग्रंथांवरून सिद्ध होतें. कुंतलेश्वर सातवाहनवंशीय शातकर्णि नामक राजाचा उल्लेख कामसूत्रांत एके ठिकाणीं स्पष्ट आहे. तो वंश परदेशी किंवा म्लेच्छजातीय होता असें मानण्यास यत्किंचितहि पुरावा नाही. उलट, शातकर्णि वगैरे नांवासारखीं त्यांचीं नांवें, सातवाहन हें वंशनाम, वगैरे सर्व गोष्टी त्या राजांचें शुद्ध भारतीयत्व आणि वैदिक धर्माभिमानित्व स्पष्टपणें दाखवितात. शकसंज्ञक वर्षगणनेचे संस्थापक राजे 'शकभूप' म्हणून शिलालेखांत व खुद्द ज्यौतिष ग्रंथांतहि उल्लेखिलेले आढळतात हें खरें आहे. परंतु हे दोन्ही प्रकारचे लेखक इतिहासविषयांत बाकीच्या पंडितांप्रमाणेच अगदी अनभिज्ञ होते हें एकदा वर सांगितलेंच आहे; आणि त्याला कोणी विरोध करील असें वाटत नाही. आज ज्याप्रमाणे कोणत्याहि विद्याविभूषित नराला अलेक्झांडरची व अशोकाची अल्पशी माहिती असली, तरी स्वतःच्या पंचविसाव्या पूर्वजाचें नांवहि माहीत नसतें, त्याप्रमाणे प्राचीन पंडितांना आपल्या काळापूर्वी चार-पांचशें वर्षे कोणाचें राज्य होतें त्या गोष्टीची कल्पनासुद्धा नसे. मग अशा लेखकांनी केलेले उल्लेख ऐतिहासिक असें समजणेंहि अयोग्य होईल. 'गुप्तकाल' म्हणून वर्षगणना स्थापन करणारे राजे जसे गुप्तवंशीय होते, तसे शकसंज्ञक वर्षगणना स्थापन करणारे राजे शकवंशीय होते अशी त्यांची भ्रांति होणें अगदी स्वाभाविक होतें. तशांत प्रस्तुत लेखाच्या प्रारंभीं सांगितल्याप्रमाणे त्या लेखकांना मनुस्मृति, महाभारत वगैरे ग्रंथांत उल्लेखिलेले कांबोज, शक वगैरे परकीय लोकच नांवानें जास्त परिचित असल्यामुळे ती भ्रांति दृढमूल होणेंहि अपरिहार्य होतें; आणि ह्या सर्व कारणांनी जो घोटाळा उत्पन्न झाला त्यांत युरोपियन पंडितांची भारतीय संस्कृतींत शक्य तेथे व शक्य तोंवर, उसनवारी लादण्याची स्वाभाविक मनीषा भर टाकण्यास नित्य सिद्ध होती. वास्तविक शक अथवा सन सुरू करणारा राजा एकच असतो. त्यामुळें 'समासु समतीतासु शकानामपि भूभुजाम्' इत्यादि बहुवचनी प्रयोगहि अर्थाच्या दृष्टीने अगदी बेंगरुळे ठरतात; आणि वर सांगितल्याप्रमाणे त्या लेखकांना ऐतिहासिक ज्ञान कांहीच नव्हतें हें ओघाने प्राप्त होतें. पुष्कळ ठिकाणीं—आणि विशेषतः ज्यौतिष ग्रंथांत—शकनृपति हा शब्दप्रयोग केवळ

शककर्ता नृपति अशा लाक्षणिक अर्थाने वापरलेला आढळतो. सारांश, असल्या शब्दप्रयोगांवरून भ्रांति मात्र निर्माण होते, तत्त्वबोध केव्हाहि होत नाही.

सातवाहन वंश परमार, तोमरादि वंशाप्रमाणे शुद्ध भारतीय व क्षात्रतेजःसंपन्न होता, ह्याविषयीं आणखीहि एक बलवत्तर प्रमाण आहे. खिस्ती शकाच्या नवव्या-दहाव्या शतकांतील काश्मिरांतील राजवंश हा प्राचीन, दाक्षिणात्य सातवाहन वंशाची एक शाखा होती. असें भट्ट सोमदेव (कथासरित्सागराचा कर्ता) आपल्या आश्रयदात्याच्या प्रशस्तींत स्पष्ट सांगतो. संग्रामसिंह हा त्या आश्रयदात्याचा पूर्वज 'श्रीसातवाहनकुलाम्बुधिपारिजातः', म्हणजे सातवाहनवंशरूपी सागरांतून निर्माण झालेला पारिजात, असा त्या प्रशस्तीचा प्रारंभ आहे. सोमदेव जरी इतिहासविषयांत बाकीच्या पंडितांसारखाच होता तरी आपल्या आश्रयदात्याच्या वंशाविषयीं तो अज्ञानी असणें शक्य नव्हतें. कारण, सर्वहि राजे आपल्या वंशाचे अभिमानी असत हें सर्वविश्रुत आहे; आणि राजाचा समकालीन पंडित निदान त्या राजाची वंशपरंपरा तरी चांगलीच जाणत होता ह्यांत शंका नाही, आणि सोमदेवाने ती तशी दिली आहे. अर्थात्, परकीय अथवा म्लेंच्छजातीय शककुलाविषयी असा अभिमान संग्रामसिंह, अनंतदेव वगैरे काश्मिरी राजांना वाटणें केव्हाहि शक्य नव्हतें; आणि जेथे सातवाहनवंश गेला तेथे त्याचा शकहि आपोआप गेला. हा उल्लेख शकवर्षगणना वायव्य प्रांतांत व काश्मिरांत मध्यकाळीं कशी रूढ झाली ह्या कूट प्रश्नावर चांगलाच प्रकाश टाकतो.

सर्व युरोपियन इतिहासलेखकांनी 'शक' ही वर्षगणना शक म्हणजे सिथियन राजांनी भारतास दिली असा आपला अभिप्राय दिला आहे, आणि त्याला पोषक प्रमाण म्हणून खिस्ती शकाच्या पहिल्या शतकांत कनिष्क हा प्रख्यात शक राजा वायव्य प्रांतांत व काश्मिरांत राज्य करीत होता, व त्याच प्रांतांत ही शकवर्षगणनाहि कांही काळ तरी प्रचारांत होती असें दिलें आहे. अर्थात्, शक हें त्या वर्षगणनेचें नांव. कनिष्कासारखा कीर्तिमान् राजा, कालमानाचें साम्य, आणि कांही काळ तरी चालू वहिवाट, इतका पुरावा जमल्यावर तो शककर्ता राजा कनिष्क असेंच सिद्ध झालें तर त्यांत नवल नाही. फक्त त्या अनुमानाला एकाच बाजूने जबरदस्त विरोध होऊं लागला की, उत्तरेंत स्थापिलेला शक सर्व दक्षिण भारत—आणि फक्त दक्षिण भारतच—कसा अखंडितपणे व्यापून आजवर टिकून राहिला? कारण बाकीच्या बहुतेक उत्तर भारतांत विक्रमसंवताचा प्रचार अव्याहत चालू आहे. एकंदरींत ह्या कूट प्रश्नाचा समाधानकारक उलगडा न झाल्यामुळे फक्त उसनवारीचा आरोप करूनच सर्व युरोपियन इतिहासकारांनी त्याला विराम दिला आहे; आणि भारतीय लेखकांनीहि त्यापुढे जाण्याची आपली ताकद नसल्याचें पर्यायाने कबूल केलें आहे. परंतु वर दिलेल्या ऐतिहासिक पुराव्यावरून मूळ दक्षिण भारतांतील शक उत्तर वायव्य प्रदेशांत कसा गेला त्याची नीट उपपत्ति लागते.

शेवटीं युधिष्ठिराच्या वर्षगणनेस 'शक' हें नांव कसें पडलें असावें ह्याविषयी अल्पशी चर्चा येथे करणे आवश्यक आहे. कदाचित् हा मूळ प्राकृत शब्द असून तो पुढे संस्कृतांत रूढ झाला असावा. महाभारतकाळीं असे कांही प्राकृत किंवा देशी शब्द प्रचारांत असल्याचा स्पष्ट पुरावा खुद्द त्या ग्रंथांतच उपलब्ध आहे:—'माघमां सेगवा इव', 'कठिनं पूरयामास', वगैरे शब्दप्रयोग त्याचा स्पष्ट पुरावा देतात; आणि नीलकंठादि महाभारताचे टीकाकार प्राचीन परंपरेने चालत आलेले त्या शब्दांचे अर्थ देतात. परंतु त्या शब्दांची व्युत्पत्ति

कांहीहि असो, तो प्रथम निवळ संज्ञाशब्द असावा असें दिसतें. ज्याप्रमाणे मूळ भारत ग्रंथास 'जय' अशी संज्ञा होती ( ततो जयमुदीरयेत् ) त्याचप्रमाणे वर्षास किंवा वर्षगणना-पद्धतीस 'शक' अशी संज्ञा पारिभाषिक अर्थाने लावण्यांत आली असावी; आणि पुढे फक्त सातवाहन राजानेच तो शब्द उचलून आपली वर्षगणना सुरू केली असावी. ज्याप्रमाणे 'पांचजन्य' हें श्रीकृष्णाच्या शंखाचें नांव असतांहि आज मराठींत त्या विशेषनामाचा वर्गनाम किंवा सामान्यनाम म्हणून उपयोग केला जातो, त्याचप्रमाणे तो शब्द पुढे अरबी 'सन' शब्दाशीं समानार्थक म्हणून रूढ झाला ह्याविषयीं मतभेद नाही. युधिष्ठिरानंतर विक्रमादित्याने 'संवत्' शब्दाची, आणि गुप्तराजाने 'काल' शब्दाची योजना केली हें प्रसिद्ध आहे. परंतु चिरपरंपरेने चालत आलेला 'शक' शब्दच अखेरीस विजयी झाला. म्लेच्छ जातींना वाचक जो 'शक' शब्द, त्याच्याशीं त्याचें वर्णसाम्य केवळ यदृच्छाप्राप्त आहे. संज्ञावाचक शब्द जरी कालान्तराने सामान्यनामासारखे रूढ झाले तरी संस्कृत कोशकार प्रायः ते विशेषनामासारखेच मानीत; आणि त्यामुळे अमरादि कोशांत तो शब्द अंतर्भूत झाला नसावा असें दिसतें.

# नवीन सभासद

**साधारण**

१. राज साळवे, पुणें ६.
२. श्री. द. ग. काळे, असोदा (पू. खा.).
३. श्री. शं. रा. सोमण, सांगली.
४. श्री. गो. म. भिडे, अमळनेर.
५. श्री. ब. का. विप्रदास, पुणें २.
६. श्री. ल. म. चक्रदेव, मुंबई ४.
७. श्री. म. भा. केळकर, मनमाड.
८. श्री. मधुकर परांजपे, पुणें २.
९. श्री. ग. दा. क्षीरसागर, पुणें २.
१०. श्री. क. दि. सोनटक्के, पुणें ४.
११. श्री. द. मा. मिरासदार, पुणें २.
१२. श्री. प्र. शं. कुलकर्णी, बल्लारपूर ( जि. चांदा ).
१३. श्री. के. एन. नलावडे, पुणें २.
१४. श्री. सुमंगला राळे, पुणें २.
१५. श्री. प्र. शं. कुलकर्णी, कोल्हापूर.
१६. श्री. भ. रा. नगरकर, पुणें २.
१७. श्री. शं. मा. डिंगणें, हडपसर ( पुणें ).
१८. श्री. रमाकांत डोमरें, बोरिवली ( मुंबई ४८ ).
१९. श्री. महेश जोशी, पुणें २.
२०. श्री. नलिनी बापट, पुणें २.

डॉ. र. वि. हेरवाडकर

# बखरींतील विभक्तिप्रत्ययप्रक्रिया

मराठेशाहींतील गद्याचा एक महत्त्वाचा प्रकार म्हणजे मराठी बखरी हा होय. प्राचीन मराठी साहित्यांतील गद्याचें दालन बव्हंशीं मराठी बखरींनी सुशोभित केलें. पंधराव्या शतकांतील महिकावतीच्या बखरीपासून आंग्लकालांतील इनामकमिशनने तयार करवून घेतलेल्या निरनिराळ्या सरदारघराण्यांच्या कैफियतीपर्यंत सुमारें चारशे वर्षांतील हें वाङ्मय आहे. भाषेच्या जीवनावर तत्कालीन राजवटीचा परिणाम होतो; किंबहुना राज्यपरिवर्तनामुळे भाषापरिवर्तन होतें. ह्या भाषाशास्त्रीय सिद्धान्तानुसार ह्या कालांत मराठीचा फारसीशीं विशेष संबंध आला. बखर-लेखक हे राजाश्रयी असल्यामुळे त्या त्या कालखंडांत मराठीवर फारसीचा परिणाम कमीअधिक प्रमाणांत झाला. बहामनी राजवटींतील मराठीप्रमाणे शिवकालीन मराठीवर फारसीची छाप राहिली तरी पेशवेकालांत ती जास्तच दडावत चालली होती; पण फारसींतील कांहीं शब्द, अव्ययें व प्रयोग मराठीने पचविले ते तसेच राहिले. ह्या संदर्भात एक महत्त्वाची बाब म्हणजे फारसी शब्दांना आत्मसात् करतांना मराठीने आपला विभक्तिप्रत्ययादि पेहराव त्यांना देऊन स्वतःचें वैशिष्ट्य सिद्ध केलें. ह्या दृष्टीने पाहतां उपरिनिर्दिष्ट ऐतिहासिक कालखंडांत मराठी भाषा स्वतःच्या तेजाने चमकतांना दिसते. इतिहासदृष्ट्या आणि वाङ्मयदृष्ट्या मराठी बखरी जशा अभ्यसनीय झाल्या आहेत, तशाच व्याकरणविशेषामुळे त्या वाचनीय झाल्या आहेत. येथे व्याकरण-विभागांतील विभक्तिप्रत्यय व सामान्यरूप ह्या एका विशिष्ट दृष्टिकोनांतून मराठी बखरींचा विचार करावयाचा आहे.

## ऐतिहासिक व्याकरणाची गरज

मराठीच्या व्याकरणाला संस्कृत-प्राकृत ( अपभ्रंश व महाराष्ट्री ) अशी प्रदीर्घ परंपरा आहे. संस्कृत व्याकरणाचा वारसा मराठीला प्राकृतद्वारा मिळालेला असला तरी मराठीच्या भाषिक जीवनांत अनेक बदल झालेले स्पष्ट दिसतात. इतकेंच नव्हे तर, एकेका कालखंडांत मराठीचें स्वरूप एकाच पद्धतीचें दिसत नाही. मराठीचें रूपात्मक ( Formal) व प्रयोगात्मक ( Functional ) असे व्याकरणग्रंथ आजवर बरेच झालेले आहेत; परंतु तिच्या ऐतिहासिक ( Historical ) व्याकरणाचा फारसा प्रयत्न अद्यापि झालेला नाही. डॉ. भांडारकरांनी मराठीच्या ऐतिहासिक स्वरूपाचा थोडासा विचार केला[1]. इतिहासाचार्य राजवाडे ह्यांनी तर मराठीचें ऐतिहासिक व्याकरण तयार केलें. त्यांचा प्रयत्न मुख्यत्वें ज्ञानेश्वरीपुरताच होता[2]. डॉ. शं. गो. तुळपुळे ह्यांचा ' यादवकालीन मराठी भाषा ' व डॉ. गं. ब. ग्रामोपाध्ये ह्यांचा ' पेशवे दप्तरांतील मराठी भाषेचें स्वरूप ' हे ह्या विषयावरील अलीकडच्या काळांतील प्रबंध होत. असें असूनहि आद्य मराठीपासून प्रचलित मराठीपर्यंत मराठी भाषेची संपूर्ण ऐतिहासिक पाहणी अद्यापिही व्हावयाची आहे.

1. Wilson Philological Lectures ( 1914 ), Chapters 4, 5.
२. ज्ञानेश्वरींतील मराठी भाषेचें व्याकरण ( शके १८३१ ).

## कांही अडचणी

एवढें प्रचंड काम होण्यास कांही अडचणी आहेत. त्यांपैकी पहिली मुख्य अडचण म्हणजे अस्सल साधनांच्या संशोधनाचा अभाव ही होय. निरनिराळ्या कालखंडांतील मराठी भाषेचे उच्चार, प्रयोग, शब्दसंग्रह ह्यांचें संशोधन होणें अत्यंत आवश्यक आहे. ह्यासाठी पूर्वतयारी म्हणजे तत्कालीन वाङ्मयाचें संशोधन हवें. अस्सल संहिता जितक्या उपलब्ध होतील तितक्या अधिक चांगल्या. तसें न झाल्यास नव्या शास्त्रीय पद्धतीने पाठचिकित्सा होणें अगत्याचें आहे. ह्याचा अर्थ असा की, अनेक हस्तलिखितांचें पाठसंकलन झालें पाहिजे. मराठीचें पाठसंकलन हें मराठीच्या स्वभावावर आधारित हवें. ह्या कार्यात संस्कृत किंवा अन्य भाषांतील पाठसंकलनाच्या पद्धतींत ह्या दृष्टीने थोडेंफार परिवर्तन करावें लागेल हें उघड आहे. अशा प्रकारच्या ऐतिहासिक व्याकरणास शुद्ध संहितांची फार गरज आहे. हें काम संशोधकाखेरीज इतरांना करतां येणें कठीण आहे.

## शुद्ध संहितांचा अभाव

मराठी बखरीपुरता विचार करावयाचा म्हणजे बखरींच्या शुद्ध संहिता किंवा अस्सल नकला उपलब्ध व्हावयास पाहिजेत. दुर्दैवाने मराठी बखरींच्या अस्सल प्रती दुर्मीळ आहेत. ह्यामुळे सर्वांत जुन्या प्रती प्रमाण मानण्याचा प्रसंग येतो. प्रकाशित बखरी थोड्याफार उपलब्ध खऱ्या; पण त्यांतहि मोठी अडचण अशी की, त्या बखरींचें प्रकाशन करतांना एकच प्रत प्रमाण मानिलेली नाही. शिवाय बखरींच्या भाषेंत नकलकारांप्रमाणे संपादकीय फेरफार झालेले आहेत. मूळ मोडीचें बालबोध करतांना कितीतरी बदल झालेला दिसतो. मोडी वाचनाच्या चुकांमुळे त्यांत आणखी भर पडलेली आहे. मराठी बखरग्रंथांच्या प्रकाशनांत वस्तुनिष्ठ संशोधनापेक्षा व्यक्तिनिष्ठ संशोधनाचा भाग अधिक आहे. त्यामुळे त्यांत मूळ मराठी भाषेचें शुद्ध स्वरूप राहिलेलें नाही. बखरग्रंथांतील मराठीचें स्वरूप उलगडणें हें महत्त्वाचें काम होय. प्रस्तुत विषयाची चर्चा प्रकाशित बखरींच्या साधनावरून केली आहे.

## शिवपूर्वकालांतील विभक्तींचीं रूपें

शिवपूर्वकालांतील आद्यबखर म्हणजे महिकावतीची बखर ही होय. ह्या बखरीचें सर्वांत जुनें प्रकरण ' राजवंशावळी ' हें गद्यात्मक असून तें शके १३७० ( इ. स. १४४८ ) च्या फाल्गुनांत लिहिल्याचें तिचा कर्ता केशवाचार्य म्हणतो.[3] ह्या प्रकरणाचा काल पंधरावें शतक म्हणजे बहामनीकाल हा होय. बहामनीकाल सामान्यतः इ. स. १३०० ते इ. स. १६०० पर्यंत मानिला जातो. ह्या कालांत यादवकालीन शुद्ध भाषा बदलून तिच्यावर फारसीचा परिणाम होऊं लागला होता. महाराष्ट्र–सारस्वतकारांच्या मतें ह्या कालांत ' अर्जं '-दारांच्या ' फिर्यादी ' ' काजी 'पुढे जाऊन त्यांचा ' फैसला ' किंवा ' इनसाफ ' होऊं लागला;[4] परंतु फारसीच्या ह्या आक्रमणाविरुद्ध मराठीने प्रतिकार करण्यास सुरुवात केली होती. त्यामुळे मराठींत संस्कृत तत्सम शब्दांचा वापर होऊं लागला व ती संस्कृतमय बनूं लागली. ' ल ' च्या बद्दल ' ळ, ' ' स ' च्या बद्दल ' श ' व ' ष, ' ' ख ' च्या बद्दल

३. महिकावतीची ऊर्फ माहीमची बखर ( शके १८४६ ), पृ. ६२.
४. महाराष्ट्र-सारस्वत ( शके १७८६ ), पृ. २१८.

'ष,' 'ढ' व 'ड' च्या बद्दल 'ध' व 'थ' असे कांहीं मुख्य फरक झाले. उभयान्वयी अव्यय 'व' व द्वितीयेचा 'ला' प्रत्यय, व्यंजनान्त शब्द उच्चारण्याची पद्धति इत्यादि फरक फारसीमुळे ह्या कालांत झाले. यादवकालीन ओकारान्त रूप नाहीसें होऊन अकारान्त व उकारान्त रूपें आलीं. 'न' व 'ण' ह्यांतील संदिग्धता राहिली. ह्या कालांत मुसलमानी राजवटी-मुळे फारसीशीं मराठीचा जो संबंध आला तो पुढे अठराव्या शतकापर्यंत तसाच राहिला.

महिकावतीच्या बखरींतील 'राजवंशावळी' ह्या दुसऱ्या प्रकरणांत विभक्तींचीं पुढील रूपें आढळतात :

| | एकवचन | अनेकवचन |
|---|---|---|
| प्रथमा | समुदाय; देवुळ | समुदायें; खतें; कागदें |
| द्वितीया | बिंबदेवास; प्रधानासि | सर्वांसि; म्हातारेयांला |
| तृतीया | स्वामिनें; त्याणें; रायें | सर्वांहि |
| चतुर्थी | कुळास, देसायाला, माहिमा | |
| पंचमी | ठाण्या होऊन | |
| षष्ठी | राजयाचे | येकयकांचि |
| सप्तमी | कळव्यांत; पैठणि; ठाणेकोकणा; दवणे | |

आधुनिक मराठींतील सामान्यरूपाचा 'य' ह्या कालांतील भाषेंत दिसून येत नाही. चतुर्थीचा प्रत्ययरहित उपयोग केला आहे. उदा० माहिमा. तृतीयार्थी 'सह' बद्दल 'सि' (परिवारेंसि) व चतुर्थीच्या 'स' बद्दल 'सि' (ठाणेयासि) हे जुने प्रत्यय ह्या बखरींत आढळतात. प्राकृतांतील 'हिंतो' आणि 'सुंतो' पासून निघालेले आधुनिक मराठीचे 'हून' व 'सून' हे प्रत्यय प्रस्तुत बखरींत 'होऊन,' 'होन' अशा स्वरूपांत आढळतात. अनुस्वाराच्या टिंबाबद्दल सबंध 'न' लिहिण्याची पेशवेकालीन पत्रव्यवहाराची पद्धति ह्या बखरींत स्वीकारली आहे. ह्यांत 'स्वप्न' हा शब्द संस्कृतांतल्याप्रमाणे पुल्लिंगी वापरला आहे. उदा० स्वप्न सांगाविला. वृति (वृत्ति), उत्पति (उत्पत्ति) सारखीं अपभ्रष्ट रूपें ह्यांत आहेत. ह्या प्रकरणांतील सुमारें १०३ यावनी शब्दांची यादी राजवाड्यांनी दिली असून त्यांच्या मतें त्या प्रकरणांतील सुमारें १२००० शब्दांत १०३ फारसी शब्द आले आहेत. म्हणजे शके १३७० तील कोकणी–मराठींत शेकडा पांच-षष्ठांश फारसी शब्द येत असत.[५]

## शिवकालांतील विभक्तिप्रत्यय

शिवकाल हा मराठीचा एक स्वतंत्र टप्पा आहे. शिवकालाच्या सुरुवातीस फारसीचा मराठीवर इतका परिणाम होऊं लागला की, तत्कालीन मराठी भाषा मुमूर्षु आहे की काय असा संदेह निर्माण झाला. मात्र शिवाजीच्या स्वराज्यस्थापनेचा एक परिणाम असा झाला की, मराठी भाषेचा प्रवाह हा शुद्ध व तेजस्वी होऊं लागला. शिवाजीने राजव्यवहार-कोश निर्माण करण्याची आज्ञा दिली व अशा रीतीने फारसीच्या वर्चस्वाला पायबंद घालण्याचा प्रयत्न केला. फारसीची मगरमिठी ह्या कालांत थोडीशी ढिलावल्यासारखी दिसते

५. महिकावतीची ऊर्फ माहीमची बखर (शके १८४६), प्रस्तावना पृ. १९

खरी; परंतु फारसीचा व पंधराव्या शतकांतील पोर्तुगीज भाषेचा लोंढा तत्कालीन मराठीला सर्वस्वीं थोपवितां आला नाहीं. शिवकालांत फारसींतून मराठींत आलेले व्यंजनान्त शब्द स्वरान्त झाले; तसेंच निभृत उच्चाराचा एक नवीन प्रकार ह्या कालांत रूढ झाला.

शिवकालीन मराठी बखरींत शब्दांचीं रूपें खालीलप्रमाणे दिसतात:—

| | एकवचन | अनेकवचन |
|---|---|---|
| प्रथमा | काशीराऊ | उंटें; वर्तमानें |
| द्वितीया | खानास; राजियासी; पराभवाते | निपुत्रियांस |
| तृतीया | म्यां | यांनीं; यांणीं; साहेबीं |
| पंचमी | विज्यानगरा होऊनु<br>वाराणशी होऊन,<br>दिल्लीहून | |
| षष्ठी | राजियाचे | पादशहांचे; सर्वांच्या; स्थळोस्थळचीं. |
| सप्तमी | चैत्रमासी; तासा | |

सामान्यरूपाचा हल्लीचा ‘ य ’ हा शिवकालीन बखरींत ‘ ईय ’ अशा स्वरूपांत आढळतो. अर्थे ( सं० ) > अत्थे ( प्रा० ) > थे ( प्राचीन मराठी ) ह्या मार्गाने आलेल्या द्वितीयेचा ‘ ते ’ प्रत्यय वापरला आहे; उदा० पराभवाते. शिवकालीन बखरींत प्रत्ययांबद्दल शब्दयोगी अव्ययें वापरलीं आहेत. मात्र प्रत्यय लागण्याच्या वेळीं नामांप्रमाणे शब्दयोगी अव्ययांना विकार झालेले आहेत; उदा० गडाखाले. ह्यांत ‘ खाले ’ हें विभक्तिप्रतिरूपक शब्दयोगी अव्यय असून त्यांत ‘ ए ’ हा सप्तमीचा प्रत्यय आहे. कित्येक ठिकाणीं विशेष्याची विभक्ति विशेषणास लावलेली दिसते; उदा० सर्वां प्रसंगीं. ‘ या ’ बद्दल ‘ ये ’ हें रूप; उदा० ये जातीने. ‘ तूं ’ ह्या सर्वनामाची तृतीया विभक्ति ‘ तुवां ’. हीं शिवकालीन बखरींचीं वैशिष्ट्यें आहेत. ह्या कालांतील मराठींत मूळ संस्कृत व फारसी शब्दांचीं अपभ्रष्ट रूपें सांपडतात; उदा० महोच्छाव, ( महोत्सव ); शैल ( शल्य ); कीर्त ( कीर्ति ); परामृष ( परामर्ष ); तनका ( तनखा ); इजत ( इज्जत ) इत्यादि. ‘ पादशाहास राजे भेटीस येतात ’ ह्यांतील ‘पादशाहास’ ह्या शब्दाचा षष्ठ्यर्थी प्रयोग व ‘ पादशाह संतोष जहाला ’ ह्यांतील ‘ पादशाह ’ ह्या शब्दांतील विभक्तिलोप हीं उल्लेखनीय आहेत.

## पेशवेकालीन भाषेची प्रत्ययप्रक्रिया

मराठी बखरी पेशवेकालांतच अधिक लिहिल्या गेल्या. विविध विषयांमुळे ह्या कालांतील मराठी बखरवाङ्मय समृद्ध झालेलें दिसतें. पेशवेकाल हा इ. स. १७०० पासून इ. स. १८१८ पर्यंत गृहीत धरला जातो. शिवकालीन स्वराज्याची भावना पेशवेकालांत तितक्या उज्ज्वल स्वरूपांत दिसून येत नाही. शाहूच्या आगमनानंतर मराठ्यांचे दिल्लीकरांशीं संबंध शिवकालाइतके तीव्र नव्हते. त्याचें एक प्रमुख कारण म्हणजे शाहूची सुटका ही दिल्लीकरांच्या मोहबतीने झाली असा एक दृढ समज महाराष्ट्रांत रूढ होता. पेशवाईतील सरदार उत्तरेंत साम्राज्य प्रस्थापित करण्यासाठीं गेले तरी दिल्लीकरांशीं प्रत्यक्ष सामना न करण्याकडे त्यांची प्रवृत्ति होती. शिवशाहींतल्या स्वराज्यांत भाषेबाबत कांही स्वतंत्र प्रयत्न जसे झाले तसे पेशवेकालांत झाले नाहीत. पेशवेकालीन पत्रव्यवहाराची भाषा फारसीच्या आहारीं गेली होती. ह्या

कालांतील मराठ्यांच्या मुलुखगिरींत मुसलमान व अन्य लोकांशीं संबंध आल्यामुळे मराठीवर झालेल्या फारसीच्या आक्रमणाला थोपवून तिच्या उच्चाटनाकडे फारसें लक्ष दिलें गेलें नाही.

महाराष्ट्रांतील मराठवाड्यांत निजामी राजवट होती; पण ती मराठ्यांना तापदायक वाटली नाही. ह्याचें प्रमुख कारण म्हणजे उत्तरेंतील महमदी कडवेपणा हा निजामी राजवटींत नव्हता. म्हणूनच या राजवटीबद्दल मराठ्यांना प्रेम वाटत नसलें तरी ती परकीय अशी वाटली नाही. उत्तरेंतील मराठ्यांचे मुसलमानांशीं संबंध व दक्षिणेंतील निजामी राजवट ह्यामुळे फारसीचा मराठीवर परिणाम कांहीसा प्रत्यक्ष व कांहीसा अप्रत्यक्ष असा झाला. तत्कालीन जीवनांत केवळ राजदरबारांतच नव्हे तर इतर व्यवहारांत म्हणजे बाजारहाट, घरदार, सैन्य वगैरे क्षेत्रांत फारसीमिश्रित मराठीचें अस्तित्व होतें. पेशवाईतील पंडित कवींची भाषा शुद्ध स्वरूपाची होती; पण तिचें क्षेत्र केवळ विद्वान् लोकांपुरतेंच मर्यादित राहिलें[६].

सारांश, बहामनीकालांत फारसीचा मराठी भाषेवर जो परिणाम झाला तो पुढे शिवकालांत व त्यानंतर पेशवेकालांत तसाच राहिला. पेशवेकालांत नाना फडणविसासारख्या कलमबहादुर मंडळींना फारसीमय मराठीचा स्वीकार करावा लागला. एक गोष्ट मात्र खरी की, मराठीनें आपले नियम फारसीला लावून उच्चारप्रक्रिया, प्रत्ययप्रक्रिया व वाक्यरचना ह्या बाबतींत स्वतःचें वैशिष्ट्य राखलें.

पेशवेकालीन बखरींतील विभक्तिप्रत्ययप्रक्रिया पुढीलप्रमाणे आहे:—

| | एकवचन | अनेकवचन |
|---|---|---|
| प्रथमा | धणी, वोढ | महादुर्गे |
| द्वितीया | माहातास | त्यांसि |
| तृतीया | तिनें; मृत्युभयें; याशीं | स्वारींनीं; यांणीं; याहीं; भाऊसाहेबीं |
| चतुर्थी | डेरियास; पुणियास; तुजला | |
| पंचमी | नगराहून | |
| षष्ठी | डोईची; सातारियाचे | रुपयांचे; सरदेशमुखीचीं |
| सप्तमी | वाडियांत; एकांतीं; जागा | महिनियांत |

पेशवेकालीन बखरींत तृतीयेचा विशेषणार्थी उपयोग केलेला आढळतो; उदा० वडिलांची आज्ञा शिरसा. पंचमी विभक्तीच्या ऐवजी तृतीयेची योजना केलेली आहे; उदा० विजापूरें निघोन. सप्तमीच्या 'ई' प्रत्ययान्त शब्दांच्या रूपांना पंचमीचे प्रत्यय लावलेले आहेत; उदा० मुक्कामीहून. विशेष्याची विभक्ति विशेषणाला लावण्याची संस्कृतांतील पद्धति ह्या कालांतील बखरींत दिसून येते; उदा० त्यांत राज्यांत. भाववाचकनामांना 'त्व' प्रत्यय लावल्याचीं उदाहरणें म्हणजे दास्यत्व, सख्यत्व हीं होत. संधि न करतां जोडशब्द उपयोगांत आणले आहेत; उदा० सूर्यअस्त. संस्कृतफारशी शब्दांचे समासहि आढळतात. उदा० बालपरवेश; आपल्यास्वस्थानावर, आपआपले स्वस्थलास ही पुनरुक्ति होय. तवेषे (त्वेषें), सैंवर (स्वयंवर) सारखीं कांही अपभ्रष्ट रूपेंहि पेशवेकालीन बखरींत आहेत. 'होत्साता' ह्या विशेषणाचा अव्ययार्थी प्रयोग वैशिष्ट्यपूर्ण आहे.

६. मराठी भाषा—उद्गम व विकास (१९३३), पृ० २२७.

## आंग्लकालीन मराठी

पेशवेकालानंतर आंग्लकाल सुरू झाला. आधुनिक मराठीचा पाया ह्याच कालांत घातला गेला. इ. स. १८१८ त पेशवाई बुडाली तरी पुढे पांच-पंचवीस वर्षें फारसीमिश्रित मराठी प्रचारांत होती. अशा रीतीने पूर्वीच्या भाषेचें स्वरूप आंग्लकालांत कांही काल राहिलें. पुढे ह्या कालांत इंग्रजी ग्रंथांच्या भाषांतरद्वारा इंग्रजी पद्धतीची वाक्यरचना, प्रयोग, लेखनखंड, विरामचिन्हें, शब्द स्वतंत्र लिहिण्याची पद्धति इत्यादि बदल झाले.

इंग्रजीविद्येच्या प्रसारामुळे ह्या गोष्टी मराठींत आल्या तरी अव्वल इंग्रजींत मात्र इंग्रजीपेक्षा संस्कृत भाषेचा परिणाम मराठीवर अधिक झालेला होता. ह्याचें मुख्य कारण म्हणजे तत्कालीन संस्कृताभिमानी शास्त्रीमंडळींनी मराठींत लेखन करण्यास सुरुवात केली व ह्या शास्त्रीमंडळींच्या साहाय्याने विद्याखात्याकडून सरकारी पुस्तकें तयार झालीं. पेशवाईनंतर फारसी-अरबी शब्द हळूहळू कमी वापरले जाऊं लागले. अशा रीतीने तत्कालीन मराठी भाषा संस्कृतमुळे प्रौढ व भारदस्त बनली. शास्त्रीमंडळींनी रचलेल्या पहिल्या मराठी कोशांत फारसीबद्दल खालील मत नोंदलेलें आहे.

'या देशींचें राज्य पूर्वी कितीएक वर्षें यवनांनी केलें; त्यामुळे यवनी भाषेंतील दर, तयार, रोज, साल, गुदस्त इत्यादि कितीएक शब्द या भाषेंत मिसळले आहेत. ते राजकीय व्यवहाराचे अनुरोधाने आले म्हणून राजकीय व्यवहारींच प्राधान्येंकरून वर्त्ततात आणि तेथेच शोभतात. इतर साधारण व्यवहारीं सरासरी बरे दिसतात परंतु शास्त्रीय व्यवहारादिसंबंधी प्रौढ म्हणून जी भाषा तींत तर अगदीच शोभत नाहीत. याकरितां प्रौढ भाषेंत ते शब्द घेऊं नयेत.'[७]

अव्वल इंग्रजींतील बखरगद्यांतील विभक्तिप्रत्यय, सामान्यरूप व वर्णांचे उच्चार आधुनिक मराठीपेक्षा निराळे आहेत. हत्तीचे पायीं, तुमचे समक्ष, आमचे स्वाधीन इत्यादि एकारान्त सामान्यरूपें तत्कालीन भाषेंत आढळतात. तंव ( तेव्हां ) ह्या अव्ययाचा बराच उपयोग होई. 'यांनीं' व 'यांणीं' हीं तृतीयेचीं दोन्ही रूपें रूढ होतीं. 'कितीएक' सारखे जोडशब्द संधीशिवाय वापरांत होते. 'नामेंकरून, निमित्तेंकरून' इत्यादि विभक्तींचे अर्थ सुचविणारीं अव्ययें उपयोगांत होतीं. 'शेवटील निरोप' ह्यांतील 'शेवटील' हें षष्ठयर्थी विशेषण लक्षणीय आहे.

## बखरभाषेचें कार्य

बखरवाङ्मयांतील विभक्तिप्रत्ययप्रक्रिया व सामान्यरूप ह्यांचें स्वरूप ह्याप्रमाणे आहे. शिवपूर्वकालापासून अव्वल इंग्रजीपर्यंत मराठीभाषामंदाकिनी निरनिराळीं वळणें घेऊन आपला मार्ग आक्रमितांना दिसते. संस्कृत व फारसी ह्या दोन्ही भाषेंतील जीवनरस घेऊन मराठीने आपला मराठमोळेपणा कायम ठेविला. विभक्तिप्रत्ययप्रक्रियेच्या बाबतींत मराठीने आपलें स्वरूप शुद्ध राखिलें. फारसीच्या आक्रमणाला तिने यशस्वीपणें तोंड दिलें ही तिची कामगिरी अभिमानास्पद आहे. मराठी बखरगद्यांतील भाषेचा विकास हा राजकीय वातावरणांत झाल्यामुळे तिच्यांत दरबारी ऐट आली; पण तिने आपली रग सोडली नाही. मराठी भाषेच्या इतिहासांत बखरगद्याचें स्थान स्वतंत्र आहे. बखरवाङ्मयांतील मराठी भाषेचें स्वरूप पाहिल्यावर तिच्या जिवंतपणाची साक्ष पटल्याविना राहत नाही. ● ● ●

७. महाराष्ट्र भाषेचा कोश ( प्रथम भाग १८२९ ), प्रस्तावना.

प्रा. पण्डित आवळीकर

# मुक्तेश्वरावर प्रकाश

## उपोद्घात

मुक्तेश्वराचें चरित्र व काव्य यांसंबंधी पुष्कळ लिहिण्यांत आलें आहे. कवि म्हणून त्याची श्रेष्ठता वादातीत आहे. मतभेद आहे तो त्याच्या चरित्राशीं निगडित असणाऱ्या कांहीं प्रश्नांसंबंधी. हे प्रश्न अनेक वेळां चर्चिले जाऊनहि अजून अनिर्णीत आहेत.

मुक्तेश्वरावर प्रकाश टाकणाऱ्या एका अलक्षित संबंधाकडे लक्ष वेधून कांही अनुमानें मांडण्याचा हा प्रयत्न आहे. मुक्तेश्वरविषयक प्रश्न निकालांत काढण्याची वा काढल्याची भ्रामक कल्पना मनांत नाही, हें आधीच सांगितलेलें बरें.

## मुक्तेश्वराचे आईवडील

मुक्तेश्वर हा एकनाथांचा नातू हें सर्वमान्य आहे. नाथांचे चरित्रकार केशव आणि महीपति यांनी या गोष्टीचा उल्लेख करूं नये याचें आश्चर्य वाटलें तरी स्वत: मुक्तेश्वराने,

मातृजनक जनार्दनी । एकनाथ नमियेला ॥

असें म्हटलेलें असल्याने[१] शंकेस जागा नाही.

नाथांना मुली किती होत्या, त्यांचीं नांवें कोणतीं होतीं, व त्यांना कोठे दिलें होतें याचा समाधानकारक निर्णय अजून लागलेला नाही. गोदा आणि गंगा या नांवांबरोबरच लीला आणि उमा अशींहि आणखी दोन नांवें पुढे आलीं आहेत.

भिन्न भिन्न अभ्यासकांनी भिन्न मतें व्यक्त केलीं तर फारसें आश्चर्य वाटूं नये. पण एकाच अभ्यासकाचीं एकाच ग्रंथांत भिन्न मतें पाहिलीं की हा विषय किती गुंतागुंतीचा आहे तें कळतें. उदाहरणार्थ, डॉ. तुळपुळे यांचे हे दोन परिच्छेद पाहा :—

( अ ) एकनाथांस एकूण चार अपत्यें झालीं. पैकीं थोरली मुलगी गोदा ही पैठणकर मुद्गलांच्या घराण्यांत दिलेली असून कवित्र मुक्तेश्वर हा तिचा मुलगा व नाथांचा नातू होय. त्यांची दुसरी मुलगी उमा ही तंजावर प्रांतीं कोणा नागनाथास दिलेली असून तिचा मुलगा माधवस्वामी हा एक महाकवि होऊन गेला.[२]

( आ ) हरिपंडित हा मुलगा आणि गंगा, गोदा व उमा या मुली, अशीं एकूण चार अपत्यें नाथांना होतीं. पैकी प्रसिद्ध कवि मुक्तेश्वर हा गंगाबाईचा म्हणजे नाथांचा नातू हें सर्वांना ठाऊकच आहे. गोदावरीची माहिती मिळत नाही. नाथांची तिसरी कन्या उमाबाई ही तंजावर प्रांतीं कोणा नागनाथास दिली होती व तिचा मुलगा म्हणजेच आपले माधवस्वामी होत.[३]

येथे मुक्तेश्वराच्या आईचें नांव एकदा गोदा तर एकदा गंगा असें दिलेलें आहे; एकदा गोदेबद्दल माहिती देऊन पुन्हा तिच्याबद्दल माहिती मिळत नाही असें सांगण्यांत आलें

---

१. आदिपर्व, १–७७.

२. महाराष्ट्र सारस्वत, पुरवणीसह, पृ. ९२७.

३. उपर्युक्त, पृ. ९९४.

आहे. डॉ. तुळपुळे यांच्यासारख्या चिकित्सक व थोर संशोधकाच्या मनांतहि असा गोंधळ उडतो. "मौज अशी की गोदावरीचें सासरचें नांव गंगाबाई व गंगाचें सासरचें नव गोदावरी असें होतें," हें पांगारकरांचें विधान[४] मौजेचें असलें तरी ही मौज अनर्थकारक आहे.

प्रथम नाथांच्या अपत्यांची संख्या निश्चित केली पाहिजे. हरि नांवाचा त्यांना एक मुलगा होता यासंबंधी वाद नाही. मुली दोन की तीन हा खरा प्रश्न आहे. नाथांना दोनच मुली होत्या असें नाथांच्या चरित्रकारांनी सांगितलेलें आहे. नाथांना तीन मुली होत्या असें म्हणतांना डॉ. तुळपुळे आधार देत नाहीत. असा आधार पुढे येईपर्यंत नाथांना दोनच मुली होत्या असें मानणें भाग आहे.

या दोन मुलींच्या नांवांतील लीला व उमा या नांवांचा प्रथम विचार करूं. लीला हें नांव भीमस्वामी देतात.[५] 'लीलाविश्वंभर' या शब्दामुळे उद्‌भवलेला गैरसमज लीला या नांवाच्या मुळाशीं आहे. परंतु ही 'भ्रामक कल्पना' आहे हें प्रा. प्रियोळकर यांनी[६] सिद्ध केलेलें असल्यामुळे लीला या नांवाचा अधिक विचार करावयाचें कारण नाही.

माधवस्वामींच्या आईचें नांव उमा होतें, हें डॉ. तुळपुळे यांचें म्हणणें बरोबर आहे. नाथांच्या एका मुलीचें नांव उमा होतें हें मलाहि मान्य आहे. पण हें तिचें सासरचें नांव होय. तिचें माहेरचें नांव कोणतें ?

या प्रश्नाचें उत्तर शोधतांना नाथांच्या मुलींचीं नांवें अनुक्रमें गोदा व गंगा अशीं होतीं हें केशव आणि महीपति यांचें म्हणणें मान्य केलें पाहिजे. "या गंगेचेंच सासरचें नांव उमा असलें पाहिजे," हें चिं. ग. कर्वे यांचें मत[७] मला पटत नाही. गोदेला पैठण येथे व गंगेला कर्नाटकांत दिलें होतें आणि गोदेचाच मुक्तेश्वर हा मुलगा असें अनेकांनी म्हटलें आहे. यासंबंधीं माझीं मतें निराळीं आहेत, तींच आता मांडतों.

गोदेचें सासरचें नांव उमा होतें व तिलाच तंजावरप्रांतीं नागनाथास दिलें होतें. माधवस्वामी हा तिचा मुलगा. याला आधार म्हणजे नाथांची दुसरी मुलगी गंगा ही—कर्नाटकांतच पण—तंजावरास दिलेली नव्हती, हा होय. या गंगेचेंच सासरचें नांव गोदा असें होतें. (पांगारकरांचें मौजेचें विधान म्हणजे अर्धसत्य आहे!) तिचा मुलगा मुक्तेश्वर होय.

ही गंगा कोठे दिलेली होती याचा खुलासा शिवरामस्वामींच्या चरित्रांतून होतो. शिवराम पूर्णानंद ऊर्फ शिवरामस्वामी हे नाथांचे पणतू होत. स्वतः त्यांनीच,

> मायेचा जो पाहतां आजि आजा ।
> तो हा येका जाहाला बाप माझा ।।

असें म्हटलें आहे.[८] 'आजा' ह्या शब्दावर टीप देतांना भावे[९] लिहितात, "याचा अर्थ 'एकनाथ हा माझे आईचा आजा' असा घ्यावयाचा की काय ? म्हणजे शिवराम हा एकनाथाचा पणतू होतो."

४. मराठी वाङ्‌मयाचा इतिहास, खंड दुसरा, पृ. ४६९.
५. भीमस्वामीकृत ; 'भक्तलीलामृत'.
६. श्रीमुक्तेश्वराचा शोध, पृ. १६.
७. भा. इ. सं. त्रै. वर्ष १९, अं. १, पृ. ११.
८. शिवरामस्वामीकृत 'भागवत एकादशस्कंध टीका'.
९. महाराष्ट्र सारस्वत, पुरवणीसह, पृ. ५१३.

शिवरामस्वामींच्या वडिलांचें नांव नारायण व आईचें नांव लक्ष्मी असें होतें. हे नारायण ऊर्फ पूर्णानंद कलबुर्गें प्रांतांत महागांव येथे राहत असत. लक्ष्मीच्या वडिलांचें नांव बाळकृष्णपंत चंद्रकेत. या लक्ष्मीसंबंधी शिवरामस्वामींनी 'गोदा आपण जाली कन्यकारूप' असें 'गीताचंद्रिके'च्या उपसंहारांत म्हटल्याचें पांगारकरांनी नमूद केलें आहे.[10] मुक्तेश्वर हा शिवरामस्वामींचा मामा असें माझें म्हणणें आहे. माझ्या मतें नाथांच्या कन्यांचा वंशविस्तार असा: –




येथेच मुक्तेश्वराचे वडील कोण याचाहि उलगडा होतो. चिंतामणि आणि विश्वंभर अशीं दोन नांवें या संदर्भात पुढे करण्यांत येतात. चिंतामणि हें नांव स्वत: मुक्तेश्वराने दिलेलें असल्यामुळे तें स्वीकारलें पाहिजे. तसेंच मुक्तेश्वराच्या वडिलांचें दुसरें नांव विश्वंभर नसून बाळकृष्णपंत होतें असें मानलें पाहिजे. लीलाविश्वंभर हा त्यांच्या आईवडिलांचा निर्देश आहे या कल्पनेतील भोंगळपणा यावरूनहि कळेल.

शिवरामस्वामींची आई ही मुक्तेश्वराची वडील बहीण असावी. शिवरामस्वामींचा जन्म शके १५५४ मधील. त्यांच्यासह लक्ष्मी-नारायणांना सात अपत्यें होतीं आणि शिवराम हा सर्वांत लहान होता. यावरून मुक्तेश्वराच्या जन्मापूर्वी ( श. १५३१ ) लक्ष्मीचा जन्म झाला असावा, हें स्पष्ट होतें.

तिला कलबुर्गे प्रांतांत दिलेलें असल्यामुळे मुक्तेश्वरास कलबुर्गी लुगडीं चांगलीं माहीत आहेत. द्रौपदीवस्त्रहरणाच्या कथाभागांत[11] तो लिहितो,

बोटधारि दुतारें । कृमिरें सुतारें सुलारें ।
कलंभिगर्भ सुहुतारें । वैरागारें चिनोडें ॥

कलंभिगर्भ म्हणजे गुलबर्गा. डॉ. सॅलेटोर[12] सांगतात, "Gulbarga was essentially a Karnatak centre, its earlier name being Kallubarige or Kallukurike" गुलबर्गा त्या काळीं लुगड्यांसाठी फार प्रसिद्ध होतें असें दिसतें. कारण अमृतरायांनाहि 'कलबुर्ग हलबुर्ग लुगडें' माहीत आहे.

---

१०. मराठी वाङ्मयाचा इतिहास, खंड दुसरा, पृ. २३९.
११. सभापर्व, १५–२२३.
१२. Karnatak's Trans--oceanic Contacts, p. 9.

४

कर्नाटकांत दिलेल्या गंगाबाईच्या पुत्राचें नांव पुंडाजी किंवा पुंड असें देऊन तो हरिभक्त म्हणून प्रसिद्ध असल्याचें केशव आणि महीपति सांगतात. हा मुक्तेश्वराचा भाऊ असावा किंवा त्याचें स्वतःचेंच नांव पुंडाजी किंवा पुंड असें असावें. "...व याच दांपत्याला मुक्तेश्वर हा 'गुंडा पुत्र' लाभला," असें लिहितांना वा. अ. भिडे[१३] यांच्या मनांत काय होतें तें सांगतां येत नाही.

**मुक्तेश्वराचें वास्तव्यस्थान**

स्वतः मुक्तेश्वराने केलेल्या 'गौतमीच्या तटाकीं,'[१४] किंवा 'गोदावरीतट निवासी'[१५] या शब्दप्रयोगांवरून तो पैठणास राहत होता हा समज दृढ झालेला दिसतो. या उल्लेखांवरून त्याचें नेहमीचें वास्तव्यस्थान सूचित होण्यापेक्षा संबंधित कृतींचें रचनास्थळ सूचित होतें, असें म्हणणें अधिक योग्य होय.

मुक्तेश्वराचे वडील चिंतामणि हे पैठणला राहत. एवढेंच नव्हे तर ते नाथांचे घरजावई होते, अशा आख्यायिका नाथचरित्रांत आढळतात. पांगारकर[१६], भिडे[१७], तुळपुळे[१८] ही मंडळी मुक्तेश्वरास 'पैठणकर' मानतात. पांगारकरांनी "पैठणास नाथांच्या वाड्याशेजारींच चिंतामणिशास्त्री यांची समाधि आहे," असा आधारहि दिलेला आहे.

आजगांवकर लिहितात[१९]:—(अ) त्यांची गोदूबाई नांवाची एक मुलगी होती; ती कुरुंदवाडाजवळ नाथांचा कोणी अत्रिगोत्री आप्त राहत असे, त्याच्या मुलास दिली होती. (आ) मुक्तेश्वरांचे तीर्थरूप चिंतामणि ऊर्फ विश्वंभरबुवा हे मूळचे राहणारे कर्नाटकांतले, परंतु ते नाथांचे घरींच पैठणास राहत असत.

वरील आख्यायिकांप्रमाणेच मुक्तेश्वर व एकनाथ यांच्याविषयीच्या अनेक दंतकथा रूढ होत्या. मुक्तेश्वराचा मुकेपणा, त्याचें एकनाथांच्या घरीं गेलेलें बालपण, गोदेंत भारताचीं पर्वें सोडणें, इ. त्यांपैकीच होत.

या आख्यायिकांतील फोलपणा उघड आहे. कारण एकनाथ शके १५२१ मध्ये समाधिस्थ झाले, तर मुक्तेश्वर शके १५३१ मध्ये जन्मास आला. अशा परिस्थितींत वरील आख्यायिकांवर विश्वास ठेवणें केवळ अशक्य आहे. चिंतोपंत हे नाथांचे घरजावई होते, तर नाथांच्या मृत्यूनंतर ते कोठे गेले? की पैठणासच राहिले? स्वतःला मुलगा असतांना नाथ एखाद्याला घरजावई म्हणून ठेवून घेतील तरी कसे?

आजगांवकरांनी मध्येच 'कुरुंदवाडाजवळ' असें म्हणून एक पिल्लूं सोडलें आहे. (म्हणजे तेरवाडला काय?) याहून 'चिंतामणि हे मूळचे राहणारे कर्नाटकांतले' हा निर्देश महत्त्वाचा आहे. "... कर्नाटकांत त्याचें वास्तव्य असावें, ही जी समजूत ती दृढ होते," असें प्रा. प्रियोळकरहि म्हणतात.[२०]

१३. मुक्तेश्वर, पृ. १–२.
१४. रामायण, युद्धकांड, ४७०.
१५. सभापर्व, उपसंहार; आदिपर्व, उपसंहार.
१६. कविवर्य मुक्तेश्वर: चरित्र आणि काव्यविवेचन, पृ. १३.
१७. मुक्तेश्वर, पृ. १.
१८. महाराष्ट्र सारस्वत, पुरवणीसह, पृ. ९२७.
१९. महाराष्ट्र कविचरित्र, भाग १ ला, पृष्ठें ३७ व ३९.
२०. श्रीमुक्तेश्वराचा शोध, पृ. २६.

मुक्तेश्वराचे वडील चिंतामणि ऊर्फ बाळकृष्णपंत हे डंबळ येथे राहत होते असें माझें म्हणणें आहे. " डंबळगांवचे बाळकृष्णपंत चंद्रकेत यांची मुलगी लक्ष्मी ही नारायण दीक्षितांस दिली होती, " असा डंबळचा उल्लेख आजगांवकरांनी करून ठेवला आहे.[२१] हे बाळकृष्णपंत व मुक्तेश्वर यांच्यांतील पितापुत्रांचें संभाव्य नातें मी नव्याने आपल्या नजरेस आणीत आहें.

डंबळ हें गांव धारवाड जिल्ह्यांत गदग–मुंडर्गी रस्त्यावर गदगहून १३ मैल दूर आहे. गांव लहान असलें तरी फार जुनें आहे. ( अर्थात् आताचीं घरें गांवाच्या जुन्या जागेंत नाहीत ! ). गांवाबाहेर एक सुंदर तळें आहे. तें ३०० वर्षांपूर्वी बांधलें गेलें असें म्हणतात.

डंबळ येथे दोड्डु बसाप्पा, कालेश्वर आणि सोमेश्वर ( दगगडी ) अशीं तीन ११ व्या–१२ व्या शतकांतील देवळें आहेत. पूर्वी या गांवांत बौद्ध विहार होता, असें त्यास पश्चिम-चालुक्य राजा दुसरा त्रिभुवनमल्ल ऊर्फ सहावा विक्रमादित्य यांनी दिलेल्या देणगीवरून कळून येतें. ही माहिती देणारा शिलालेख १०९५ मधील असून त्यावर तारा किंवा तारादेवीची मूर्ति आहे. डंबळ येथील ( आता पडलेल्या ) किल्ल्यांतील जैन देवळाजवळ हा लेख सांपडला.[२२]

यावरून डंबळवरील एके काळच्या बौद्ध व जैन प्रभावाची कल्पना यावी. शिलालेखांतून या गांवाचें नांव धर्मपुर किंवा धर्मपोळल् असें आढळतें. तेथील देवळें खरोखरच प्रेक्षणीय आहेत. ' दोड्डु बसाप्पा ' हें नांव सार्थ ठरविणारा प्रचंड व सुंदर नंदी त्या देवळांत आहे. याच देवळांतील ब्रह्मयाचें चित्र खरे यांनी दिलें असून, " यास पांच मस्तकें आहेत हें याचें वैशिष्टय आहे, " असें म्हटलें आहे.[२३]

मुक्तेश्वर डंबळ येथे होऊन गेल्याचा बहिरंग पुरावा अजून मिळूं शकला नाही हें मी कबूल करतों. अत्रिगोत्री, आश्वलायनसूत्री, करवीरनिवासिनी लक्ष्मी व सोनारीचा भैरव हीं कुलदैवतें असणारें एखादें ब्राह्मण घराणें डंबळ येथे सापडतें काय याचा मीं कसून शोध केला. असें घराणें आज तेथे नाही. पूर्वी तेथे नव्हतेंच असें मात्र यावरून म्हणतां येणार नाही.

मुक्तेश्वरी महाभारतांतून कांही अंतरंग पुरावे देण्याचा प्रयत्न मी करणार आहें. हीं अनुमानें आहेत हें मीं प्रारंभींच म्हटलें. पण बळकट पुरावे मिळविण्याचें साधन म्हणून या अनुमानांकडे पाहिलें पाहिजे.

बौद्धरूपिया जगदीशा । कौरवीं मांडिली माझी हिंसा ।
करुणाकरा कृष्णा परेशा । प्राणरक्षक मज होईं ॥

असा द्रौपदीच्या मुखीं येणारा बुद्धावताराचा उल्लेख[२४] बुद्धविहाराच्या दर्शनामुळेहि सुचणें शक्य आहे. गदग ते डंबळ या मार्गांत अनेक लहान लहान डोंगर लागतात व ते मुक्तेश्वराच्या एका सुंदर उत्प्रेक्षेची जणूं जन्मकथा सांगतात. या डोंगरांनाच त्याने 'शिवपिंडिका'[२५]

२१. महाराष्ट्र कविचरित्र, भाग ३ रा, पृ. १०१.
२२. Bombay Gazetteer, Vol. XXII, pp. 660--665. Fleet : Indian Antiqueri, X 185.
२३. मूर्तिविज्ञान, चित्र, ३ आणि पृ. ९.
२४. सभापर्व, १५–१४६.
२५. उपर्युक्त, १०–१९६.

म्हटलें असावें असें वाटूं लागतें. कापसाने मार्थे आच्छादिण्याचा दृष्टांत[२६] त्याच्या प्रदेशांतील कापसाच्या पिकाची विपुलता दाखविणारा आहे. जोंधळ्यावर पडणाऱ्या रोगांचीं नांवेंहि[२७] येथे आठवण्यासारखीं आहेत. इंचळ येथे जोंधळा व कापूस हीं पिकें मुख्यतः निघतात हें सांगितलें पाहिजे.

मुक्तेश्वराने प्रवास खूप केला होता याचा प्रत्यय त्याच्या वर्णनांतून येतो वास्तव्यामुळे धारवाड जिल्ह्याशीं त्याचा निकटचा संबंध आला असावा आणि या प्रदेशाच्या पौराणिक इतिहासामुळे मुक्तेश्वरास महाभारतरचनेची स्फूर्तीहि मिळाली असावी. "The traditional history of Dharwar goes back to the time of the Pandavas;" हा समज[२८] येथे नोंदण्यासारखा आहे. विशेषतः, "Hangal fifty miles south of Dharwar in inscriptions of the twelfth century is called Viratkot and Viratanagari", ही माहिती[२९] उपयुक्त वाटावी.

पांडवांनी विराटनगरींत प्रवेश केला तेव्हाच्या वर्णनांतील[३०]'दुर्गाप्रासादाशीं', "Hangal has thirteen temples,— three of Hanuman and one each of Durga"...[३१] ही माहिती जुळते. एवढेंच नव्हे तर या तेरा देवळांत एक 'कीचकाजिता'चें देऊळ आहे. मुक्तेश्वराने हें सर्व आपल्या डोळ्यांखालून घातलें असावें आणि त्याच्या काळीं या स्थळांसंबंधीच्या पौराणिक स्मृतीहि अधिक उत्कट असाव्यात, हेंहि मुक्तेश्वराच्या प्रत्ययकारी वर्णनांचें एक कारण आहे.

याच्याच जोडीला मुक्तेश्वराने केलेले कर्णाटक-यंत्र,[३२] कर्णाटक युद्ध[३३] विंध्यादेवी,[३४] शैव-वैष्णव[३५] आणि जैन-वेदांती[३६] यांचे वाद, हे उल्लेख-त्याचें वास्तव्य कोठे होतें हें सिद्ध करणारेच आहेत.

मुक्तेश्वरास द्रविड देशांतील मानून त्याच्या भाषेंत द्राविडी लकबा शोधणें हा 'द्राविडी प्राणायाम' ठरेल अशी भीति वाटते. मुक्तेश्वराने धर्माबरोबर वनांत गेलेल्या ब्राह्मणांचीं नांवें,

गुर्जर महाराष्ट्र कर्नाटक। आंध्र चौल मल्याळ देश।
पंचद्राविडी अनेक। धर्मासंगीं चालिले॥

अशीं दिलीं आहेत[३७]. राजसूय यज्ञाच्या वेळीं पांडवांच्या दिग्विजयांत पुढील नांवें येतात[३८]—

२६. सभापर्व, उपसंहार, ५.
२७. वनपर्व, १–१४२.
२८. Bombay Gazetteer, Vol. XXII, p. 389.
२९. उपर्युक्त.
३०. विराटपर्व, १–६७.
३१. Bombay Gazetteer, Vol. XXII, p. 723.
३२. वनपर्व, १५–१८४.
३३. आदिपर्व, ३१–५५.
३४. सभापर्व, ५–१७८.
३५. सभापर्व, १०–७६, ७७.
३६. वनपर्व, १५–१०२.
३७. वनपर्व, १–३२.
३८. सभापर्व, ८–१३१.

कर्नाटक पांड्य प्रबळ । द्रविड आणि चोळ मंडळ ।
अंध्र ताळवन विशाळ । काळीक उद्भट उत्कळिक ।।

यावरून एकतर पंचद्राविडांची कल्पना मानली पाहिजे किंवा कर्नाटक आणि द्रविडदेश हे भिन्न मानले पाहिजेत. ज्या सैल आचारांसंबंधी मुक्तेश्वर लिहितो, ते 'कुरुपांचाळ देशीं मल्याळीं', किंवा, 'केरळमल्याळ सिंधुपारीं' प्रचलित होते. प्रवास करीत असतां मुक्तेश्वरास तेथील कांही गोष्टी विचित्र वाटल्या त्या त्याने येथे टिपल्या इतकाच या वर्णनाचा अर्थ आहे. 'द्रविडदेश' हा शब्द निश्चितार्थबोधक नाही, उलट गोंधळ उडविणारा आहे. म्हणून मुक्तेश्वराचें वास्तव्य कर्नाटकांत होतें, असें म्हणणें सयुक्तिक ठरतें.

भाषेचा कौलहि असाच पडेल. मुक्तेश्वराच्या भाषेत तामिळ शब्द शोधण्यापेक्षा कन्नड शब्द शोधणें श्रेयस्कर होईल. ( हें रसास्वादाला आवश्यक मात्र नाही. ) मुक्तेश्वर व कुमारव्यास यांच्या दोन उताऱ्यांतील विलक्षण साम्य शं. बा. जोशी यांनी दाखविलेंच आहे.[३९] कुमारव्यासहि डंबळच्या परिसरांतीलच.

### श्रीमुक्तेश्वराचें देऊळ

प्रा. प्रियोळकरांनी श्रीमुक्तेश्वराच्या देवळाचा शोध देशभर घेऊन शेवटीं, "कवि मुद्गलाने कोठल्या मुक्तेश्वराच्या प्रेरणेवरून 'मुक्तेश्वर' असें मुद्रानाम धारण करून 'महाभारत' लिहिलें याचा निश्चय होत नाही," असें म्हटलें आहे.[४०] प्रा. प्रियोळकरांसारख्या थोर संशोधकाने इतक्या अनाग्रही बुद्धीने लिहिल्यावर मीं ठामपणाने लिहिणें हें केवळ धारिष्ट होय. म्हणून प्रामाणिक मतभेदाला एक जागा आहे ती दाखवितों.

मुक्तेश्वराच्या देवळाचा शोध देशभर घेणें आवश्यक आहे असें मला वाटत नाही. कारण धारवाड जिल्ह्यांतच चौदडंपूर या तुंगभद्रा तीरावरील गांवांत मुक्तेश्वराचें देऊळ आहे. हें गांव राणेबेन्नूरच्या उत्तरेस सुमारे १५ मैलांवर आहे. येथील देवळासंबंधी माहिती मिळते ती अशी:—"Mukteshwar's is a black stone temple less graceful than the Dodda Basappa temple at Dambal, but a fine bold building of the same age and style ( 1000-1100 ) with its detail more completely finished than in the Dambal temple......As a design the chief defects of the Mukteshwar temple are the form of its dome, and the smallness of its crowning pot or Kalash."[४१]

चौदडंपूर येथील मुक्तेश्वराच्या आणि डंबळ येथील दोड्ड बसाप्पाच्या देवळांत जी तुलना करण्यांत आली आहे ती सूचक आहे. दोड्ड बसाप्पा हें नांव मला त्या मानाने अर्वाचीन वाटतें. या देवळाचें जुनें नांव कोणतें होतें मुक्तेश्वर असें होतें काय याचा शोध होणें जरुरीचें आहे. कारण देवळांत 'मोठा नंदी' असला तरी आंत जें लिंग आहे त्यालाहि कांही नांव असलें पाहिजे. तेंहि मुक्तेश्वराचें देऊळ ठरलें तर हा प्रश्न कायमचा सुटेल. सध्या तरी कांचीच्या मुक्तेश्वराबद्दल जें विधान[४२] प्रा. प्रियोळकरांनी केलेलें आहे तेंच चौदडंपूरच्या मुक्तेश्वराबद्दल करतां येईल.

३९. मऱ्हाटीसंस्कृति : कांही समस्या, पृ. १०४.
४०. श्रीमुक्तेश्वराचा शोध, पृ. २८.
४१. Bombay Gazetteer, Vol. XXII, p. 659. Ferguson in Architecture of Dharwar and Mysore, p. 57, photograph 39.
४२. श्रीमुक्तेश्वराचा शोध, पृ. २७.

चिंतामणीचें देवागार । स्पर्शमणीच नंदिकेश्वर ।
नादनिधीचि मनोहर । सोमसूत्रीं शिवलिंगें ॥

अशी एक ओवी मयसभा-वर्णनांत[४३] येते. मुक्तेश्वराच्या देवळाची निश्चिति करतांना निकष म्हणून वरील ओवीचा उपयोग करावयास हरकत नाही. चिंतामणि आणि स्पर्शमणि हे कविसंकेत म्हणून बाजूस ठेवले तरी कोणत्या देवळांत नाद अधिक घुमतो व कोठे 'सोमसूत्रीं शिवलिंगें' आहेत, याचा शोध घेतला पाहिजे. कारण कल्पनेलाहि प्रत्यक्षाचा आधार असतोच.

### मुक्तेश्वर आणि लीलाविश्वंभर

मुक्तेश्वराची कुलस्वामिनी करवीरनिवासिनी महालक्ष्मी व कुलदैवत सोनारीचा भैरव यांसंबंधी वाद नाही. रेणुकेचाहि तो उपासक असावा असें त्याने दिलेल्या कांही दृष्टांतांवरून वाटतें.[४४] मुक्तेश्वरावर शैव संप्रदायाची दाट छाया पडलेली दिसते. "कवि मुक्तेश्वर दत्ताला शिवस्वरूपच मानतो" या प्रा. प्रियोळकरांच्या विधानांत[४५] मोठा अर्थ आहे. उपमा-दृष्टांत देतांना शंकर-गंगा, गौरी-शंकर, भवानी-चंद्रचूड,[४६] यांचा विसर त्याला पडत नाही. राम-सीतेचें मीलन म्हणजे शिवशक्तीचेंच मीलन होय; किंवा भरत व राम यांची भेट म्हणजे जीवशिवैक्य होय,[४७] या त्याच्या कल्पना या संदर्भात आठवतात. हृदयलिंग,[४८] जिव्हालिंग[४९] हे शब्दहि त्याच्या शिवभक्तीचेच द्योतक आहेत.

पृथ्वीला किंवा पर्वतांना लिंग वा शिवपिंडिका म्हणणें[५०] ही मुक्तेश्वराची आवडती व भव्य कल्पना आणि त्याने आपल्या ओव्यांचें 'बाणलिंगें' असें केलेलें वर्णन[५१] काव्यात्मक तसेंच सूचक आहे. मुक्तेश्वर म्हणजे शंकर हें त्याचें उपास्य दैवत होतें...."लीलाविश्वंभर व मुक्तेश्वर एकच होत," असें मलाहि वाटतें. कारण लीलाविश्वंभर म्हणजेहि शंकर. किरातार्जुन युद्धाच्या समारोपांत अर्जुनाच्या मुखीं पुढीलप्रमाणे शिवस्तुति येते[५२]:—

लीले करिशीं विश्वजनन । कृपादृष्टी प्रतिपालन ।
प्रलयीं करूनी सर्वदहन । शेष उरशीं तूं एक ॥

या ओवींतील 'लीले करिशीं विश्वजनन' या शब्दांतील आशयच लीलाविश्वंभर या पदांत आहे.

चामरसाच्या 'प्रभुलिंगलीले' च्या मराठी अनुवादास व्रह्मदास 'लीलाविश्वंभर' असें नांव देतो. 'लीलाविश्वंभराची करणी', 'लीलाविश्वंभराचें चरित्र' असा या शब्दाचा वापर तो

४३. सभापर्व, २–५२.
४४. सभापर्व, १५–१४२; वनपर्व, १४–१२.
४५. श्रीमुक्तेश्वराचा शोध, पृ. २१.
४६. वनपर्व, ६–२१, ३०, ४५.
४७. वनपर्व, १५–२४२, २५४.
४८. विराटपर्व, १–९.
४९. आदिपर्व, २–५०.
५०. सभापर्व, १६–६६; वनपर्व, १०–१९६.
५१. वनपर्व, ७–२१७.
५२. वनपर्व, ४–१३६.

करतो. 'विश्वंभराची अतर्क्य लीला' हा त्याचा शब्दप्रयोगहि टिपण्यासारखा आहे. 'विश्वंभर-चरित्र' आणि 'शंभुचरित्र' हे शब्द तो समानार्थक म्हणूनच वापरतो[५३] विश्वंभर किंवा लीलाविश्वंभर हे शब्द शिववाचक आहेत, हें यावरून स्पष्ट व्हावें.

दत्तात्रेय असाहि या शब्दाचा अर्थ आहे, हें प्रा. प्रियोळकरांचें म्हणणें मला मान्य आहे. एकनाथाकडून आलेली दत्तोपासनाहि मुक्तेश्वरास चालवायची होती. त्यांत मुख्यत: तो शिवोपासक होता, म्हणून त्याने दोन्ही दैवतांचा उल्लेख लीलाविश्वंभर या श्लिष्ट शब्दांतून केला असें माझें म्हणणें आहे.

परमार्थाने मुक्तेश्वर व लीलाविश्वंभर एकच ठरले तरी लौकिकदृष्ट्या ते भिन्न होते की काय, अशी शंका पुढील ओवीवरून येते: –

लीलाविश्वंभरप्रसादें । मुक्तेश्वरअवधूतगुणानुवादें ।
भारतनलिनीचीं अरविंदें । महदाख्यान सुपंक्ती ।।

कारण लीलाविश्वंभरप्रसाद आणि मुक्तेश्वरअवधूतगुणानुवाद या दोन भिन्न गोष्टी आहेत. मुक्तेश्वराच्या गुरुसंबंधी अजून संशोधन होण्याची आवश्यकता आहे.

### समारोप

मुक्तेश्वर आणि शिवरामस्वामी यांच्यांतील एका अलक्षित संबंधावर लक्ष केंद्रित करून मनांत आलेले कांही विचार मांडले आहेत. एकनाथांसंबंधी लिहितांना पांगारकरांनी म्हटलें होतें, "पहिल्या मुलीचा मुलगा मुक्तेश्वर हा जगविख्यात कवीश्वर झाला व दुसऱ्या मुलीचा नातू शिवरामस्वामी हाहि नाथांना शोभण्यासारखा निघाला.[५४]

नाथांना दोन मुली होत्या. त्यांतील एका मुलीचा मुलगा माधवस्वामी व नातू रामपंडित आणि कृष्णपंडित असल्यामुळे शिवरामस्वामीस दुसऱ्या मुलीचा ( मुक्तेश्वराच्या आईचा ) नातू मानणें भाग होतें. यामुळे पांगारकरांचें विधान दुरुस्त करतांना मुक्तेश्वरावर कांही प्रकाश पडेल असें वाटलें.

डंबळ येथून मुक्तेश्वर तेरवाडास आला याचें एक कारण असें की, कर्नाटकावर त्या वेळीं विजापूरचा अंमल होता. मराठी राज्याची पहाट दिसूं लागल्यावर मराठीचा हा महाकवि स्वातंत्र्यसूर्याला अर्घ्य द्यावयास तिकडे गेला नसता तरच नवल. शिवाय नृसिंहवाडी येथे त्याचें एक आराध्यदैवत होतें.

मुक्तेश्वराचा मुलगा निरंजन व भावे[५५] यांनी निर्देशिलेला, " शिवरामाचा गुरुबंधु, म्हणजे पूर्णानंदाचा शिष्य निरंजन " हे एकच असतील तर मुक्तेश्वराचा मुलगाहि ग्रंथकार होता असें मानावें लागेल. मुक्तेश्वर हें कवीने धारण केलेलें नांव असून, मुद्गल हें त्याचें व्यक्तिनाम होतें, हें शंकातीत सत्य असल्यामुळे त्यासंबंधी कांहीच चर्चा न करतां येथेच थांबतों. ● ● ●

---

५३. नवें नवनीत, पृ. ३१५–३१६.
५४. मराठी वाङ्मयाचा इतिहास, खंड दुसरा, पृ. २४१.
५५. महाराष्ट्र सारस्वत, पुरवणीसह, पृ. ५१३.

अनुक्रमणिका

गं. व. ग्रामोपाध्ये

# भाषेचें व्याकरण आणि शुद्धाशुद्धविवेक

व्याकरण हा शब्द ' वि ' आणि ' आ ' हे उपसर्ग जोडलेल्या ' कृ ' धातूपासून तयार झाला आहे. याचा अर्थ, संस्कृत व्याकरणाच्या परंपरेप्रमाणे " शब्दस्पष्टीकरणशास्त्र ". ' व्याक्रियन्ते व्युत्पाद्यन्ते शब्दा: अनेन ' अशी पतञ्जलीने त्याची व्याख्या सांगितली आहे. म्हणजे शब्दांचें स्पष्टीकरण करणारें, त्यांचे प्रकृतिप्रत्ययादि विकार उलगडून दाखविणारें शास्त्र तें व्याकरण-शास्त्र. ' शब्दानुशासन ' असें नांव आपल्या व्याकरणाला पतञ्जलीने दिलें तें याच अर्थानें. साहजिकच संस्कृत व्याकरणांत वाक्यांतील शब्दांचा परस्पर संबंध वाक्याच्या संदर्भांत संपूर्ण दाखविला जात नाही. वस्तुतः वाक्यांत शब्द येतात ते त्या वाक्याचे घटक म्हणून. वाक्यरचनेंत त्यांना कांही विशिष्ट स्थान असतें. तें कर्ताक्रियापदादि शब्दांशीं असणाऱ्या त्यांच्या संबंधावर अवलंबून असतें. परंतु या गोष्टींचा विचार संस्कृत व्याकरणशास्त्र करीत नाही.

इंग्रजी व्याकरणशास्त्राची पद्धति याहून वेगळी आहे. त्यांत शब्दापेक्षा वाक्याला अधिक महत्त्व असतें. म्हणजे त्यांत शब्दांचा विचार तर केला जातोच, पण त्याबरोबर त्या शब्दांच्या साहाय्याने सबंध वाक्याचाहि विचार केला जातो. येथे शब्द पारखले जातात ते वाक्याचे घटकावयव म्हणून. एखाद्या कुटुंबांतील व्यक्ति जशा परस्परांशीं संबंधित असतात, आणि पुनः त्या सान्या कर्त्या पुरुषावर अवलंबून असतात, तद्वत् वाक्यांतील शब्दांचें परस्परांशी आणि पुनः क्रियापदाशीं निकटचें नातें असतें. म्हणून इंग्रजी व्याकरण विचार करतें तो मुख्यतः वाक्याचा आणि पर्यायानें त्यांतील शब्दांचा. इंग्रजी भाषेच्या अप्रत्ययी ( analytical ) स्वरूपाचाहि हा परिणाम असावा.

मराठी भाषा संस्कृत-प्राकृतोत्पन्न असली तरी तिच्यांत खूपच बदल झालेला आहे. संस्कृत भाषेचा प्रत्ययी स्वभाव तिनें अजून राखला असला तरी त्याबरोबर विभक्तिप्रत्यया-ऐवजी शब्दयोगी अव्ययें वापरण्यालाहि तिने आपल्या जन्मापासूनच सुरुवात केलेली आहे. क्रियापदांचीं रूपें बनवितांना ती सहाय क्रियापदांचाहि उपयोग करीत आहे. शिवाय शिवकालांत आलेल्या फार्शी-उर्दूच्या संबंधाप्रमाणे गेल्या एक-दीड शतकांत तिचा सामासिक स्वरूपाच्या इंग्रजी भाषेशींहि निकट संबंध आला आहे. या सर्वांचा परिणाम तिच्या एकंदर प्रकृतीवर होणें अपरिहार्य होतें. मराठी भाषेच्या प्रकृतिप्रत्ययांचा विचार करतांना, म्हणजेच तिच्या व्याकरणाचा विचार करतांना, संस्कृत व्याकरणशास्त्राप्रमाणेच इंग्रजी व्याकरणशास्त्राचीहि मदत घेणें अवश्य आहे तें यासाठीं.

भाषा ही मुख्यतः बोलली जाणारी असते. भाष् म्हणजे बोलणें; म्हणजे बोलली जाते तीच वस्तुतः भाषा. भाषेची मूळ प्रवृत्ति कोठे आढळत असेल तर ती या तिच्या बोली स्वभावांतच; आणि म्हणूनच व्याकरणकार जेव्हा एखाद्या स्थिररूप पावलेल्या ग्रांथिक भाषेचा विचार करीत असतो, तेव्हादेखील त्याला तिच्या मागच्या वा तिच्याबरोबरीने प्रचारांत असणाऱ्या बोली भाषेचाहि विचार करावा लागतो. व्याकरणाचार्य पाणिनीनेहि आपल्या

अनुक्रमणिका

'अष्टाध्यायीं'त वेदांतील ( छन्दसि ) भाषेबरोबर तत्कालीन रूढ भाषांचाहि ( भाषायाम् ) विचार केला आहे तो यासाठीच. हेमचन्द्राने आपल्या प्राकृत व्याकरणांत सुरुवातीलाच ' लोकात् इति च वर्तते । ' किंवा ' लोकात् अवगन्तव्यः । ' असें म्हटलें आहे, तेंहि यासाठीच. ही झाली प्राचीनांची साक्ष. आजहि मराठी भाषेचीं जीं व्याकरणें लिहिलीं गेलीं आहेत वा जात आहेत, तीं मुख्यत: प्रमाण ग्रांथिक भाषेचीं असलीं तरी त्यांतील प्रमाण भाषा कांही एका विशिष्ट वर्गाची बोलभाषाच आहे. भाषेंत कालांतराने परिवर्तन होतें तें तिच्या बोली स्वभावामुळेच; किंबहुना तिच्यांत स्थानपरत्वें, ज्ञातिपरत्वें, वा इतरहि कांही कारणपरत्वें जे भाषाभेद आढळतात तेहि मुख्यतः या तिच्या बोली स्वभावामुळेच. भाषेचें जिवंतपण या तिच्या बोली स्वभावांतच असतें. परंतु बोलणाऱ्याच्या मुखयंत्रांतून व्यक्त होणारी ध्वनिरूप भाषा जेव्हा लिपीच्या संकेतांत अवतरते, किंवा खरें सांगावयाचें म्हणजे डांबली जाते, तेव्हाच तिला लिखित वा ग्रांथिक रूप प्राप्त होतें. हें लिखित रूप एका दृष्टीने तिच्या जिवंतपणाला मर्यादाच घालतें. गतिरूप जिवंत भाषेची ही जणू स्थितिरूप अवस्था असते. जिवंत बोलभाषेचें संजीवन तिला मिळालें तर त्या अवस्थेंतहि आपलें ताजेंपण ती टिकवूं शकते किंवा नवीन रूपांत पुनः अवतरते. व्याकरणशास्त्र हें तिच्या या कोणत्याहि अवस्थेची नाडीपरीक्षा करूं शकतें. तें जसें एखाद्या इतिहासजमा झालेल्या, पण लिखित रूपांत सांपडलेल्या भाषेचें व्याकरण सांगतें, तसेंच ज्या बोलभाषेला अजून लिपीचा स्पर्शहि झाला नाही अशा एखाद्या भाषेचीहि प्रकृति तपासतें. व्याकरण हें केवळ ग्रांथिक प्रमाण भाषेचेंच असतें असें नाही; किंबहुना अशी कोणतीहि वा कोणत्याहि अवस्थेची भाषा नसेल की जिला तिचें स्वतःचें व्याकरण नाही. भाषा जन्मते ती आपलें प्रकृतिप्रत्ययादिरूप घेऊनच. हें तिचें रूप, अर्थातच, ती ज्यांच्याकडून बोलली जाते, त्यांच्या प्रकृतीवरहि अवलंबून असतें. बोलणाऱ्यांचा स्वभाव, त्यांचे रीतिरिवाज, त्यांची वागणूक, त्यांचा एकंदर सांस्कृतिक दर्जा इत्यादि अनेक गोष्टी तिचें रूप घडवितात. कोणत्याहि भाषेला मानसशास्त्रीय व समाजशास्त्रीय अधिष्ठान असतें तें असें; आणि अशा कोणत्याहि भाषेचें स्वरूप तपासणें, तिच्या प्रकृति-प्रत्ययादि रूपांची पारख करणें, आणि त्यांना एका विशिष्ट पद्धतींत बसविणें एवढेंच व्याकरण-शास्त्राचें वा व्याकरणकाराचें काम.

भाषेची परीक्षा करतांना व्याकरणकार जो दृष्टिकोन स्वीकारील व जी पद्धति अंगी-कारील त्या दृष्टिकोनावरून व पद्धतीवरून व्याकरणाचेंहि स्वरूप ठरतें. एखाद्या विशिष्ट काळच्या व साधारण स्थिररूप पावलेल्या भाषेचें प्रकृतिप्रत्ययादि रूप सांगणारें व्याकरण लिहिलें तर तें केवळ वर्णनात्मक व्याकरण होईल. परंतु भाषेला जी विशिष्ट अवस्था प्राप्त झालेली असते ती कांही एकदम अचानक प्राप्त झालेली नसते. तिच्यामागे कांहीएक परंपरा असते, इतिहास असतो. गतकालांतील कोणत्या तरी अवस्थेची ती एक विशिष्ट परिणति असते; आणि जर आजच्या भाषेचें सम्यक् स्वरूप पाहावयाचें असेल तर तिच्या मागील या ऐति-हासिक परंपरेची पाहणी करावीच लागेल. या पाहणींतूनच ऐतिहासिक व्याकरण तयार होतें. तसेंच कोणत्याहि भाषेचीं नातींगोतींहि कांही कमी नसतात. मराठी आणि गुजराती आज भिन्न भाषा बनलेल्या असल्या तरी त्यांची मूळ जन्मदात्री एकच असल्याने त्यांच्यांत भेदाप्रमाणे कांही साम्यहि आढळणें शक्य आहे. या साम्यभेदांचा विचार करीत व्याकरण रचिलें तर त्यांतून तौलनिक व्याकरण तयार होईल. व्याकरणाचे हे तीनहि प्रकार एकाच

मोठ्या व्याकरणाच्या शाखा होत; आणि त्यांच्या साहाय्याने कोणत्याहि भाषेचें सम्यक् स्वरूप लक्षांत येतें.

× × ×

कोणत्याहि भाषेचें तिचें असें अंगभूत 'व्याकरण' असतें, आणि तें तिच्या प्रकृतींत एकजीव झालेलें असतें हें खरें. परंतु व्याकरणकार जेव्हा तें स्पष्ट करतो, तेव्हा तें कशासाठी करतो? त्याचा प्रत्यक्षांत उपयोग काय? जे लोक ती भाषा जन्मापासून बोलत असतात, म्हणजे ती ज्यांची जन्मभाषा असते त्यांना आपला भाषिक व्यवहार त्या भाषेच्या व्याकरण-ज्ञानाशिवायहि करतां येत असतो. मग त्यांना त्याचा उपयोग काय? वस्तुतः त्यांनाहि त्याचा उपयोग जरूर होत असतो. आपल्या भाषेची जडणघडण कळणें, तिच्या प्रकृतिप्रत्ययादिकांच्या योग्य ज्ञानानें तिच्या अभिव्यक्तीच्या सामर्थ्याची कल्पना येणें हा उपयोग अगदीच दुर्लक्षणीय नाही. परंतु याहीपेक्षा त्याचा अधिक उपयोग होतो तो परभाषिकांना ती भाषा शिकतांना. पर-भाषेचा अभ्यास मुख्यत: तिच्या व्याकरणनियमांच्या साहाय्याने केला जातो, करावा लागतो आणि हें एकापरी योग्यहि आहे. "शुद्ध कसें बोलावें आणि शुद्ध कसें लिहावें, तसेंच हें शुद्ध कां आणि हें अशुद्ध कां हें व्याकरण शिकल्याने समजतें", हें जें दादोबांचें म्हणणें आहे तें परभाषेच्या संदर्भांतच अधिक बरोबर आहे. परंतु दादोबांनीं हें आपलें मत 'महाराष्ट्र भाषेच्या व्याकरणांत' दिलें आहे आणि तें व्याकरण तर मराठी भाषेंतून विद्याभ्यास करणाऱ्या मराठी भाषिक विद्यार्थ्यां-साठीं लिहिलें होतें; म्हणजे स्वभाषेच्या अभ्यासांतदेखील व्याकरणज्ञानाची त्यांना आवश्यकता वाटत होती. कृष्णशास्त्री चिपळूणकरांचेंहि मत असेंच असावें. कारण "ज्यांची जी जन्मभाषा आहे त्यांस ती लिहितां व बोलतां येण्यास त्या भाषेचें व्याकरण कळण्याची तादृश गरज दिसत नाही खरी"; असें सांगूनहि पुनः "तथापि बोलणें व लिहिणें हीं कलेदाखल येण्यास व्याक-रणाचें ज्ञान पाहिजे...... ज्यास उत्तम वक्ता किंवा प्रौढ ग्रंथकार व्हावयाचें असेल त्यास स्वभाषेच्या व्याकरणाचें ज्ञानदेखील फार उपयोगी पडेल" असें त्यांनीं प्रतिपादन केलें आहे. दादोबादि वैयाकरणांनी स्वभाषेच्या व्याकरणज्ञानाची ही जी उपयुक्तता सांगितली आहे आणि व्याकरणज्ञान आणि शुद्धाशुद्धविवेक यांची जी सांगड घातलेली आहे ती कां? शुद्धाशुद्धविवेक हें व्याकरणशास्त्राचें प्रयोजन म्हणतां येईल का? आणि हें जर प्रयोजन असेल तर तें व्याकर-णाच्या मूळ स्वरूपाशीं सुसंगत आहे का? आणि असल्यास कोणकोणत्या बाबतींत?

व्याकरणशास्त्र (वा व्याकरणशास्त्राभ्यास) आणि भाषेची शुद्धाशुद्धता यांची सांगड आजची नाही. ती फार जुनी आहे. उलट आजचे व्याकरणकार त्या दोघांना तारतम्यपूर्वक अलिप्त ठेवतांना दिसतात; परंतु प्राचीन काळीं तें शक्य नव्हतें; नव्हे, व्याकरणशास्त्राचा, निदान भारतांत तरी, जो जन्म झाला तोच मुळीं भाषेच्या शुद्धाशुद्धाच्या कल्पनेंतून. पाणिनीच्या काळीं वेदमंत्रांचा अर्थ स्पष्ट करून दाखविण्याची आवश्यकता निर्माण झाली होती. निरुक्त-कारांनी व्युत्पत्तीच्या साहाय्याने त्यांतील शब्दांचा अर्थ सांगितला, तर वैयाकरणांनी पृथक्करण-पद्धतीने त्यांतील रूपांची यथार्थता सिद्ध केली. वेदांतील भाषेहून लौकिकांतील भाषा बदलत चालली होती; एतद्देशीय अनार्यांच्या संघर्षांत ती 'अपभ्रष्ट' होत होती. इतकेंच नव्हे तर, गौतमबुद्धाच्या उदयानंतर अपभ्रष्ट मानल्या गेलेल्या भाषांना—प्राकृतांना—प्रतिष्ठाहि लाभत होती. साहजिकच पाणिनीसारख्या वेदभाषेच्या व पुष्कळ प्रमाणांत तिला जवळ असणाऱ्या उदीच्य देशांतील उच्चवर्णीयांच्या संस्कृत भाषेच्या अभिमान्याला तिला नियमांच्या चौकटींत बसवून तिचें रक्षण करण्याची आवश्यकता वाटली. पाणिनीने आपली 'अष्टाध्यायी' लिहिली ती याच

अनुक्रमणिका

उद्देशानें. पतञ्जलीनें त्यावर महाभाष्य रचिलें त्याचाहि उद्देश तोच होता. 'रक्षार्थं वेदानां अध्येयं व्याकरणम्' असें तो स्पष्टच म्हणतो; आणि म्हणून तो आपल्या 'व्याकरणमहाभाष्या'ला 'शब्दानुशासन' असें नांव देतो. 'शब्दानुशासन' म्हणजे शब्दांचे नियम सांगणारें शास्त्र. म्हणजे अपभ्रष्ट शब्दांना व रूपांना दूर ठेवून नियमाप्रमाणे चालणाऱ्या शुद्ध शब्दांचें, म्हणजेच शुद्ध भाषेचें शास्त्र. भारतांत व्याकरणशास्त्राची सुरुवात झाली ती याप्रमाणे भाषेंतील शुद्धाशुद्धाच्या निवाड्यापासून. साहजिकच या परंपरेचा परिणाम तदनंतरच्या भारतीय भाषांच्या व्याकरणांवर झाला. पाणिनी, पतञ्जलि हे भारतीय वैयाकरणांचे आदर्श. संस्कृत भाषेचें माहात्म्यहि कांहीं कमी नव्हतें. म्हणून तर वररुचि, हेमचंद्र यांसारख्या प्राकृत भाषांच्या वैयाकरणांनीहि आपलीं व्याकरणें संस्कृतांत लिहिलीं. मराठीचा आद्य व्याकरणकार पंडित भीष्माचार्य हा स्वतः संस्कृत पंडित होता व त्यानें लिहिलेलें 'पंचवार्तिक' म्हणजे मुख्यतः आनोनाशाच्या संस्कृत 'लक्षणरत्नाकरा'चा मराठी अनुवाद आहे. ही झाली प्राचीनांची गोष्ट. अव्वल इंग्रजींतील सुरुवातीचे व्याकरणकारहि संस्कृत पंडित होते. या पंडित मंडळींनी आपलीं महाराष्ट्र भाषेचीं व्याकरणें रचिलीं तीं संस्कृताध्ययनबलेंकरून. प्रारंभीं दादोबांना संस्कृत भाषेचें प्रत्यक्ष शिक्षण नव्हतें तरी त्यांचे गुरु बापूशास्त्री शुक्ल यांच्याकडून त्यांना संस्कृत व्याकरणपद्धतीचा थोडाफार परिचय झाला होता. त्यांनी प्रथम आपलें व्याकरण इंग्रजी व्याकरणाच्या धर्तीवर लिहिलें असलें, तरी नंतर नर्मयरामशास्त्री यांजकडून संस्कृत भाषा व संस्कृत व्याकरण यांचा त्यांनी अभ्यास केला. सारांश, संस्कृत व्याकरणपरंपरेचा व तिच्यांत अनुस्यूत असलेल्या भाषेच्या शुद्धाशुद्धविवेकाचा परिणाम थेट अव्वल इंग्रजींतील वैयाकरणांपर्यंत पोहोचलेला दिसतो. 'शुद्ध कसें बोलावें व शुद्ध कसें लिहावें व हें शुद्ध कां व हें अशुद्ध कां हें व्याकरण शिकल्यानें समजतें', हें मराठीच्या पाणिनीचें वाक्य म्हणूनच एकापरी, त्या परंपरेशीं सुसंगत असेंच आहे.

अव्वल इंग्रजींत, व्याकरणकारांच्या संस्कृताध्ययनबलाप्रमाणे पाठ्यपुस्तकांसाठी आवश्यक असणाऱ्या प्रमाण मराठी भाषेची गरजहि मराठी व्याकरणांत भाषेच्या शुद्धाशुद्धाच्या विचाराचा अंतर्भाव करण्यास कारण झाली. मुंबई इलाख्याचे त्या वेळचे गव्हर्नर एल्फिन्स्टन्‌साहेब यांच्या प्रेरणेनें एतद्देशीय लोकांना देशी भाषेंत शिक्षण देणारी Native School Book and School Society स्थापन झाली, आणि ठिकठिकाणीं इंग्रजी-मराठी शाळा निघाल्या. शाळांसाठी पाठ्यपुस्तकें आणि पाठ्यपुस्तकांसाठी प्रमाण मराठी भाषा यांची गरज भासणें स्वाभाविक होतें. ही गरज भागविण्यासाठी कोश, व्याकरण इत्यादि ग्रंथांचे 'कारखाने' सुरू झाले. या सुरुवातीच्या प्रयत्नांचें एक फल म्हणजे शास्त्रीमंडळीनें तयार केलेलें व हस्तलिखित स्वरूपांत वापरण्यांत आलेलें 'महाराष्ट्र भाषेचें व्याकरण' होय. परंतु तें म्हणावें तसें 'बरोबर झालें नसल्यानें' गंगाधरशास्त्री फडके यांच्याकडून तें सुधारून घेऊन १८३६ सालीं छापलें गेलें. दादोबांचें व्याकरणहि याच सालचें. पंडितमंडळींनी आणि नंतर दादोबांनी आपल्या व्याकरणासाठी जी भाषा प्रमाण म्हणून मानली, ती 'महाराष्ट्र देशाचा मध्यभाग जो पुणें प्रांत' त्यांतली; आणि त्यांपैकीहि "जी भाषा राजकीय आणि विद्वान् लोक बोलतात" तिचाच त्यांनी स्वीकार केला. बोली स्वरूपांतली जिवंत भाषा सर्व प्रदेशांत एकरूप राहूं शकत नाहीं याची त्यांना स्वच्छ कल्पना होती. ते म्हणतात, "दहा-बारा कोसांवर भाषा बदलते म्हणून जी लोकांची म्हण आहे ती अक्षरशः खरी आहे; इतकेंच नाही, परंतु जे भाषाभिज्ञ आहेत त्यांच्या ऐकण्यांत शब्दवैचित्र्यावरून, स्वरभेदावरून व जातिपरत्वेंहि निरनिराळे प्रकार येतात. कोकणांतच या भाषेचे चार-पांच प्रकार आढळतात.

दमणपासून मुंबईपर्यंत एक ... मुंबईच्या दक्षिणेस अष्टागर प्रांताच्या भाषेचा प्रकार निराळा; पुढे रत्नागिरी प्रांताची शुद्ध कोकणी भाषा यापेक्षा विशेष निराळी. राजापूर प्रांताच्या भाषेचा प्रकार निराळा; तेथून मालवणी निराळी ....... पुढे शुद्ध गोमंतकी भाषा ...... देशस्थ भाषेंतहि याचप्रमाणे प्रकार आढळतात. " ( महाराष्ट्र भाषेचें व्याकरण; प्रस्तावना, आवृत्ति तिसरी, १८५७ ). महाराष्ट्रांतल्या भाषाभेदांची दादोबांना कशी यथार्थ जाणीव होती याची यावरून कल्पना येते. या त्यांच्या जाणिवेमुळेच मराठी भाषेला नियमांत आणण्याची व तद्वारा लेखनाची प्रमाण बोधभाषा तयार करण्याची आवश्यकता त्यांना पटली असावी. वर उल्लेखिलेल्या १८५७ सालच्या तिसऱ्या आवृत्तीच्या प्रस्तावनेंत ते म्हणतात, " अलीकडेस दर्पण व तदनंतर प्रभाकर हीं वर्तमानपत्रें निघाल्यापासून मोठा लाभ हा झाला की, त्यांच्या द्वारे येथील लोकांत मराठींत गद्यरूपाने लिहिण्याचा प्रचार चांगला वाढत चालला आहे. तेव्हा अशा समयीं व्याकरणद्वाराने भाषेचें नियमन करणें किती आवश्यक आहे हें सुज्ञ पुरुष जाणतच असतील. " आपल्या व्याकरणांत व पुन्हा 'पूरणिके'त मधून मधून जीं वैकल्पिक रूपें त्यांनी दिलीं आहेत व कांही ठिकाणीं अमुक रूपें त्याज्य व अमुक रूपें अशिष्ट असे जे उल्लेख केले आहेत तेहि याच त्यांना पटलेल्या आवश्यकतेचे द्योतक आहेत. दादोबांनी भाषेंत शुद्ध आणि अशुद्ध असा जो भेद केला आहे तो शिष्ट आणि अशिष्ट या अर्थानेच. " महाराष्ट्र देशाचा मध्यभाग जो पुणें प्रांत, त्यांत जी भाषा राजकीय आणि विद्वान् लोक बोलतात " ती म्हणजे या भागांतील शिष्टांची सभासंमेलनप्रसंगीं बोलण्याची जी भाषा ती दादोबांच्या मतें प्रमाण भाषा. लेखनप्रसंगीं याच भाषेचा बोधभाषा म्हणून उपयोग करावा, असें त्यांचें म्हणणें. दादोबांनी शुद्धाशुद्धाचा भेद केला तो या रीतीने. पाणिनीला त्याच्या काळीं विशिष्ट भाषा सुसंस्कृत म्हणून स्थिर करण्याची जशी आवश्यकता वाटली, तशींच आवश्यकता मराठीच्या पाणिनीला (व इतर वैयाकरणांनाहि) वाटली; आणि म्हणून व्याकरणाची व्याख्या सांगतांनाच त्याच्याशीं अंगभूत असणारें त्याचें प्रयोजनहि सांगावयाला ते विसरले नाहीत. ते म्हणतात, " व्याकरण म्हणून एक शास्त्र आहे. जेणेंकरून भाषेचें तत्त्वज्ञान होतें, म्हणजे तिचे आंतील नियम कळतात व तेणेंकरून शुद्ध कोणतें व अशुद्ध कोणतें हें यथायोग्य कळतें. "

भाषेचें व्याकरण आणि त्याच्या स्वभावाशीं सुसंगत असणारें व शुद्धाशुद्धविवेक सांगणारें त्याचें प्रयोजन यांचा परस्परसंबंध हा याप्रमाणे स्पष्ट होत असला तरी तेवढ्याने या प्रश्नाचा विचार संपत नाही. व्याकरणाचा भाषेच्या शुद्धाशुद्धविवेकाशीं जो प्रयोजनरूप ( व परिणामरूपहि ) संबंध येतो तो व्याकरणाने सांगितलेल्या भाषेच्या नियमांमुळे; आणि भाषेचे नियम जे व्याकरणकार बसवितो ते भाषेचा एकंदर स्वभाव लक्षांत घेऊन; म्हणजे भाषेंतील शुद्धाशुद्धाचा विचार हा येट भाषेच्या मूळ स्वभावाचाच एक अपरिहार्य परिणाम तर नसावा ?

भाषा ही मूलतः बोलली जाते, आणि बोललेली ऐकली जाते. बोलणारा व ऐकणारा हे दोन भाषेचे प्रमुख घटक होत. या दोन घटकांच्या भावनांची व विचारांची देवाण-घेवाण होते ती भाषेच्या साहाय्याने. पण भाषा अवतरते ती ध्वनिरूप घेऊन. विशिष्ट ध्वनींना वा ध्वनिसमूहांना कांहीएक अर्थ प्राप्त होतो तो संकेताने. ' अस्मात् पदात् अयं अर्थः बोधव्यः इति ईश्वरेच्छा संकेतः शक्तिः ' म्हणजे अमक्या ध्वनीपासून अमका अर्थ घ्यावा हा केवळ ईश्वरनिर्मित संकेत. ध्वनिरूप भाषेला लिपिचिन्हांकित रूप आलें तें नंतर; आणि तेंहि पुनः संकेतानेच. हें सांकेतिक अक्षररूप भाषेंतील सर्वच्या सर्व ध्वनि साकार करूं शकतें, असेंहि नाही; नव्हे, तें करूंच शकत नाही. शिवाय जिवंत ध्वनिरूप भाषा लिपिचिन्हांत डांबली की

निःसत्व भासते ती निराळीच. भाषेच्या या मूळ जिवंत ध्वनिस्वरूपामुळे बोलणाऱ्याच्या उच्चारसामर्थ्याला व ऐकणाऱ्याच्या श्रवणशक्तीला महत्त्व येतें. शिवाय त्या दोघांचे स्वभाव, त्यांचे विशिष्ट संस्कार, त्यांची परिस्थिति इत्यादींचा त्यांच्या भाषेवर परिणाम होतो तो निराळाच. त्यामुळे भाषेची प्रगति वा परागति ती भाषा जे बोलतात त्यांच्या प्रगतीवर वा परागतीवर अवलंबून राहते. एखाद्या वन्य आदिवासीच्या भाषेबरोबर दुसऱ्या एखाद्या पुढारलेल्या व जगांतील प्रगत भाषिकांशीं दळणवळण करणाऱ्या समाजाच्या भाषेची तुलना केली म्हणजे हें चटकन् ध्यानांत येतें. भाषा ही, या रीतीने, ती जे लोक बोलतात त्यांच्या सांस्कृतिक अवस्थेची जणू दिग्दर्शिकाच बनते. भाषेच्या स्वभावांतील सामाजिकता स्पष्ट होते ती या रीतीनें. भाषेला प्रेरक असणाऱ्या वक्ताश्रोतासंबंधामुळे ती जन्मते तीच मुळी सामाजिकतेचे गुणधर्म घेऊन. भाषेचेंहि एक समाजशास्त्र बनतें तें या कारणाने; आणि पुन: तिच्या स्वतःच्या प्रकृतिधर्मामुळे तिचें असें एक मानसशास्त्र असतेंच. म्हणजे तिच्या जीवमानांत या दोहोंचाहि कमीजास्त परिणाम होणें स्वाभाविक आहे. भाषेच्या या दुहेरी स्वभावामुळे, म्हणजे मानसशास्त्रीय-समाजशास्त्रीय ( Socio-psychological ) स्वभावामुळे तिच्यांत संतत अवस्थांतरें होत जातात. भाषा प्रथम अवतरते ती बोलीस्वरूपांत. ही तिची प्रथम अवस्था. या अवस्थेंत तिला तिच्या जन्मजात प्रेरणेनुसार अनेक भावना, अनेक विचार, अनेक ऐंद्रियगोचर अनुभव व्यक्त करावेसे वाटतात; आणि ती त्या साऱ्यांची अभिव्यक्ति या ना त्या प्रकाराने करीत असते. अभिव्यक्तीच्या या प्रयत्नांतच तिच्यांत एकप्रकारचें चैतन्य अवतरतें, गतिमानता येते, जिवंतपणा येतो. नवीन नवीन अनुभव, विचार वा कल्पना व्यक्त करण्यासाठी ती नवीन नवीन शब्द बनविते, रूपसिद्धीचे नवे नवे प्रयोगहि करते. यासाठीं कोणाची उसनवारी करावी लागली, कोणाचें अनुकरण करावें लागलें तरी तिला त्यांत कमीपणा वाटत नाही. कारण निरनिराळ्या प्रकारांनी अभिव्यक्ति—आणि तीहि नवीन विचारकल्पनांची—करणें हा तिचा छंदच बनलेला असतो. भाषेच्या जीवमानांतील नवचैतन्याचा काळ तो हाच. या काळांत, म्हणजे या तिच्या अवस्थेंत एकाच अर्थाचे एकाहून अधिक शब्द, अधिक शब्दप्रयोग आढळतात. वैकल्पिक रूपांची समृद्धि असते. बारीकसारीक अर्थच्छटा व्यक्त करण्याला त्यांचा उपयोग होतो. परंतु नवचैतन्याचा हा काळ भाषांच्या जीवनांत फार काळ राहतोच असें नाही. या नवचैतन्याच्या व उत्साहाच्या आणि म्हणूनच थोड्याफार स्वैर स्वरूपाच्या वृत्तींतून हळूहळू स्थिरतेची वा व्यवस्थेची आवड निर्माण होऊं लागते. अनेक बोलींतून एखादी बोली महत्त्व पावते; अनेक वैकल्पिक रूपांतून विशिष्ट रूपें मान्य ठरतात; आणि अखेर त्यांना शिष्टमान्य अशी पदवी मिळते. लेखकांचे वर्ग पुढे येतात आणि तेहि याच शिष्टभाषेचा आदर करतात; आणि त्यांतूनच लेखनाची प्रमाण भाषा तयार होते. भाषेच्या जीवमानांतील ही थोडीफार स्थिररूप, स्थितिरूप पावणारी अवस्था. वाङ्मयाच्या जीवनांतील दृष्टान्त द्यावयाचा तर, नवचैतन्याच्या romantic अवस्थेनंतर आलेली ही अभिजात ( classical ) अवस्था. या अवस्थेंत भाषेला प्रमाणबद्धता येते, शिष्टमान्यता मिळते. शिष्टांनी सभासंमेलनप्रसंगीं तिचाच वापर केल्यामुळे तिला शिष्टमान्यतेबरोबर आपोआप लोकमान्यताहि लाभते; आणि अखेर वैयाकरण पुढे येतो आणि तिला नियमांत बसवून शास्त्रमान्यताहि देतो. अर्थात्, भाषेच्या गतिमान् जीवनांत ही स्थिर, सुव्यवस्थित अवस्थाहि जशीच्या तशी टिकून राहतेच असें नाही. सुव्यवस्थाहि केव्हा केव्हा जाचक होते; नियम काचूं लागतात; आणि नव्या जिवंत अनुभवांच्या वा विचार व कल्पनांच्या अभिव्यक्तीला ते अडसर घालतात. भाषेच्या या अवस्थेंत ती दिसावयाला समृद्ध दिसते; पण ती समृद्धि केवळ दिसण्या-

पुरतीच असते. अभिव्यक्तीचा आंतला जोम कमी झालेला असतो. पुनः एकदा वरच्याप्रमाणे वाङ्मयीन दाखला द्यावयाचा तर ही तिची क्षीणावस्था ( decadence period ) असते; अर्थात् अशा वेळीं तिच्या अवतीभोवतीच्या बोलींतून संजीवन मिळालें तर एखाद्या समर्थ लेखकाच्या आधारें ती बंड करून उठते. निषिद्धांचा आदर करते, अशिष्टांना शिष्ट बनवते; ग्रांथिकतेच्या बाहेर असणाऱ्या अनेक बोलींचें हरतऱ्हेचें साहाय्य घेते; आणि पुनः एकदा ती चैतन्याने उजळून निघते. हवा तो नवीन अर्थ, नवीन अनुभव, नवीन कल्पना वा विचार इत्यादि जें व्यक्त करणें तिला अशक्य होतें तें आता सहज शक्य होतें. भाषेच्या जीवमानांतील हें चक्रनेमिक्रम आहेत; आणि ते तिच्या जन्मजात स्वभावानुसार घडलेच पाहिजेत. त्याशिवाय तिच्या जन्माचें सार्थक होणार नाही. भाषेच्या या अवस्थांतरापैकी प्रत्येक अवस्थेंत शुद्धाशुद्धांचा प्रश्न जरी येत असला तरी तिच्या सुव्यवस्थित, प्रमाणबद्ध आणि शिष्टादृत अशा अवस्थेंत तो अधिक महत्त्वाचा ठरतो. कारण या अवस्थेंतील भाषेला व्याकरणकारानेहि नियमांत बसवून मान्यता दिलेली असते. मात्र येथे शुद्ध म्हणजे केवळ शिष्टमान्य व व्याकरणसंमत, हें पुनः निराळें सांगणें नलगे. वस्तुतः कोणतीहि बोलभाषा—मग ती एखाद्या बाजूच्या प्रदेशाची असो वा एखाद्या अल्प जमातीची असो—अशुद्ध असत नाही. भाषा ही भाषा असेल तर ती शुद्धच असणार. बोलणाऱ्याचा भावार्थ ती यथार्थतेने व्यक्त करीत असेल व ऐकणाऱ्याला त्यांत कुठेहि विसंगति आढळत नसेल, तर ती शुद्धच असते. किंबहुना भाषेला शुद्ध आणि अशुद्ध हीं विशेषणें लावणेंच योग्य नव्हे. परंतु शुद्ध म्हणजे त्या बोलीच्या प्रवृत्तीशीं सुसंगत आणि अशुद्ध म्हणजे तिच्या प्रवृत्तीशीं विसंगत एवढाच अर्थ घेतला, तर शुद्धाशुद्धासंबंधीच्या गैरसमजांत भर पडणार नाही. एका बोलींत जीं रूपें स्वाभाविकरीत्या सुसंगत असतात तींच रूपें दुसऱ्या बोलीशीं सुसंगत असतीलच असें नाही. नव्हे, नसणेंच स्वाभाविक आहे. कारण तसें नसतें तर त्या दोन बोलींना निराळें अस्तित्वच आलें नसतें.

भाषेंत अशुद्ध शिरण्याचें व तिची प्रकृति बिघडण्याचें आणखीहि एक कारण देतां येतें. जेव्हा एका वंशाच्या भाषेचा अन्य वंशाच्या भाषेशीं या ना त्या कारणाने संबंध येतो, व परिणामतः धेडगुजरी संकर होऊं लागतो तेव्हाहि तिच्यांत 'अशुद्ध', 'अपभ्रष्ट' शिरण्याची शक्यता असते. आर्यांच्या वैदिक भाषांचा जेव्हा एतद्देशीयांच्या भाषांशीं संबंध आला तेव्हा असेंच झालें. आपल्या मराठी भाषेचा फार्शीउर्दूशीं संबंध आला तेव्हाहि त्याची पुनरावृत्ति झाली. फार्शीउर्दू शब्दांचीच आयात मराठींत झाली नाही तर प्रत्ययादि विकारहि फार्शीउर्दूप्रमाणे होऊं लागले. मराठींत नामांना लागणारे प्रत्यय व लागणारीं शब्दयोगी अव्ययें नामांच्या पुढे येतात. परंतु फार्शींत तीं नामांच्या मागे लागतात. मौजे उझार्डे, किल्ले वंदन यांतील षष्ठीचा 'इ' प्रत्यय व 'दरसाल दरशेकडा' यामधील 'दर' हें अव्यय उदाहरणादाखल देतां येतील. किंबहुना सप्तमीचा अर्थ व्यक्त करण्यासाठी पूर्वगामी फार्शी 'दर' आणि पश्चाद्गामी मराठी प्रत्यय 'इ' हे दोन्ही वापरले जाऊं लागले. उदा. दर दिवशीं. विरुद्ध प्रवृत्तीच्या दोन भाषांच्या संकराचा हा परिणाम. तो भाषेंत विकृति निर्माण करावयाला कारण न झाला तरच नवल. भाषेच्या निकोप प्रकृतीच्या दृष्टीने हें अनिष्टच आणि म्हणून हे प्रयोग सरसहा भाषेंत होऊन त्या भाषेशीं एकजीव होईपर्यंत त्यांना अशुद्ध म्हणणेंच प्राप्त आहे. अव्वल इंग्रजींत मराठीचा इंग्रजी भाषेशीं संबंध आला तेव्हाहि या गोष्टी थोड्याफार प्रमाणांत झाल्याच. भाषादूषणाचे जे प्रकार विष्णुशास्त्री चिपळूणकरांनी निबंधमालेंत दिले आहेत व ते दूर करण्याचे जे उपायहि सांगितले आहेत त्यांची येथे आठवण व्हावी. अर्थात्, भाषादूषणाचे ते प्रकार आज शिष्ट-

मान्यहि झाले आहेत हा भाग वेगळा. कारण तोहि भाषेच्या स्वभावगुणाचाच भाग आहे. अपभ्रष्ट, विकृत, अशुद्ध आणि विसंगत असें जें जें प्रथम वाटत असतें, तें सारें ती आत्मसात् करते. त्या साऱ्यांवर आपला असा ठसा उठवून त्यांना आपल्यांत एकरूप करून घेते. हें करीत असतांना तिच्या रंगरूपांत कांहीच बदल होत नाही, असें नाही. तो जरूर होतो; परंतु तो बदल तिच्या विकासांत उपकारकच ठरतो. कारण त्यामुळें ती विद्रूप होण्याऐवजी एका निराळ्या सौंदर्याने नटून जाते. फार्शीउर्दूच्या संसर्गाने ती आपलें स्वत्व घालविण्याऐवजी अधिक ऐटबाज, डौलदार बनली. अभिव्यक्तीचें तिचें सामर्थ्यहि वाढलें. किंबहुना आपल्या जीवनविकासांत तिने पुढचा टप्पा गाठला. सारांश, भाषेच्या जीवनांत जीं जीं अवस्थांतरें घडतात त्यांत कांही काळ ज्यांना अशुद्ध, अशिष्ट, अपभ्रष्ट इत्यादि विशेषणांनी संबोधिलें जातें त्यांचा संपर्क होणें अपरिहार्य असतें; किंबहुना त्यांच्या प्रतिक्रियेने तर ती पुन: अधिकाधिक समृद्ध होत जाते. भाषेच्या एकंदर प्रकृतीशीं, तिच्या विकसनशील स्वभावाशीं त्यांत शिरूं पाहणाऱ्या शुद्धाशुद्धाचा संबंध येतो तो असा; आणि म्हणून भाषेच्या प्रकृतिप्रत्ययादींचा आलेख काढणाऱ्या व्याकरणाच्या संदर्भांत तिच्यांतील शुद्धाशुद्धाचा विचार करणेंहि अगत्याचें ठरतें.

भाषेचें व्याकरण आणि शुद्धाशुद्धविवेक यांच्या परस्परसंबंधाच्या विवेचनांत भाषेच्या एकंदर स्वभावाचा विचार करणें अगत्याचें ठरतें, तसें भाषेला जो अर्थ असतो त्या अर्थाचाहि विचार करणें अगत्याचें असतें का? म्हणजे भाषेच्या अर्थाचा आणि तिच्या प्रकृतींत शिरणाऱ्या अशुद्धाचा कांही संबंध आहे का? भाषा म्हटली की ती सार्थच असणार. कारण तिचा जन्मच मुळी कांहीएक अर्थ व्यक्त करण्यासाठी झालेला असतो. इतकेंच नव्हे तर भाषा आणि तिचा अर्थ यांचें अद्वैत असतें. हें अद्वैत भाषेच्या केवळ स्थूलरूपांत नसतें, तर तें तिच्या प्रत्येक घटकावयवांत, कणाकणांत असतें. भाषेंतील नुसते शब्दच सार्थ असतात असें नव्हे, तर त्यांना होणारे बारीकसारीक विकारहि अर्थपूर्ण असतात कारण शब्दांना जे विकार होतात ते विशिष्ट अर्थ व्यक्त करण्यासाठीच होतात. भाषेच्या या संपूर्ण सार्थत्वामुळेच वक्ता आणि श्रोता यांच्यांत संवाद होऊं शकतो; वाच्य-वाचक-संबंध प्रस्थापित होतो. भाषेच्या प्रकृतिप्रत्ययादि अंगोपांगांत, याप्रमाणे, सामावलेल्या अर्थामुळेच व्याकरणशास्त्रालाहि भाषेच्या अर्थाची दखल घ्यावी लागते; निदान त्याकडे दुर्लक्ष करून चालत नाही. वस्तुत: भाषेंतील शब्दांचा अर्थ देण्याचें काम कोशाचें. शब्दांच्या जातीचा वा अन्य कांही स्थूल विशेषांचाहि उल्लेख कोश करतो. परंतु त्यापलीकडे वाक्यांत शब्दांना जे विकार होतात त्यांचा विचार कोश करणार नाही. भाषा म्हणजे कांही केवळ विकारहीन मुंड्या शब्दांची निर्जीव सांखळी नव्हे. कर्ता, कर्म, क्रियापदादींच्या विशिष्ट संघटनेने बनलेल्या वाक्यांची ती एक इमारत असते. लिंग, वचन, विभक्ति, काळ, अर्थ इत्यादींच्या विकारांनी तिचा प्रत्येक चिरा सांधलेला असतो. शब्दांना हे जे विकार होतात ते विशिष्ट अर्थ व्यक्त करावयाचा असतो म्हणूनच. भाषेला जो अर्थ येतो तो केवळ तिच्यांतील नुसत्या शब्दांच्या अर्थामुळे नसून, शब्दांना जे विशिष्ट विकार होतात त्या विकारांमुळेच; आणि व्याकरणशास्त्र हें भाषेंतील शब्दांना होणाऱ्या या विकारांचाच मुख्यत: विचार करीत असल्यामुळे, व्याकरणशास्त्रालाहि पर्यायाने त्या विकारांत अंतर्भूत असणाऱ्या अर्थाचीहि दखल घ्यावी लागते. व्याकरणाचा व भाषेच्या अर्थाचा संबंध येतो तो या प्रकारें. निदान भारतांत तरी व्याकरणशास्त्राचा जन्म होण्यास जीं कारणें झालीं त्यांत भाषेचा अर्थ नीट कळावा हें एक प्रमुख कारण होतें. वेदांतील सूत्रें तदनंतरच्या लोकांना नीट कळेनाशीं झालीं तेव्हाच निरुक्त, व्याकरण, छंद, शिक्षा इत्यादि षड्शास्त्रें निर्माण झालीं. हळूहळू या शास्त्रांना इतकें महत्व आलें की त्यांना 'वेदाङ्गें' म्हणून संबोधिलें जाऊं लागलें; आणि या वेदाङ्गांत

व्याकरणाला शिरोधार्य स्थान मिळालें. त्याला 'वेदानां वेदः' असें म्हटलें जाऊं लागलें तें याचमुळे. भर्तृहरि तर त्याला 'व्याकरणस्मृति' म्हणतो. इतकें व्याकरणाला महत्त्व आलें, आणि तेंहि केवळ वेदांचा अर्थ व्यवस्थितपणें त्यांतील भाषेच्या प्रकृतिप्रत्ययादिकांचा यथायोग्य विचार करून सांगूं शकतें म्हणून.

व्याकरण आणि भाषेचा अर्थ यांच्या संदर्भात आणखीहि एका गोष्टीचा उल्लेख करणें अवश्य आहे; आणि तोहि प्राचीन भारतीय वैयाकरणांनी केलेल्या बहुमोल विचाराच्या आधारें. शब्द उच्चारतांच तो नष्ट होतो तर त्याचा अर्थ श्रोत्याला कळतो कसा ? वाक्य उच्चारलें जात असतां एकामागोमाग एक असे वर्ण वा ध्वनि उच्चारले जातात. एका वर्णाच्या उच्चारानंतर दुसरा वर्ण उच्चारीत असतां पहिला वर्ण नष्ट झालेला असतो. या रीतीने संपूर्ण वाक्य जेव्हा उच्चारलें जातें, तेव्हा जर लागलीच तेंहि नाहींसें होत असतें तर त्याचा अर्थ श्रोत्याच्या मनांत यावा कसा ? या प्रश्नाचें उत्तर भारतीय वैयाकरणांनी ' स्फोट '-सिद्धांताच्या आधारें दिलें आहे. ' स्फोट '-सिद्धांताचें स्वरूप व त्याचें सामर्थ्य वा मर्यादा येथे स्पष्ट करण्याचें कारण नाही. परंतु उच्चारित शब्द ( वा वाक्य ) क्षणध्वंसी असला, अनित्य असला तरी त्या शब्दांत (वा वाक्यांत) सूक्ष्मपणें वसणारा ध्वनि–जो श्रोत्याला स्फोटरूपाने प्रतीत होत असतो–हा अखंड असतो, नित्य असतो. पाणिनि वा इतर वैयाकरणांना मान्य असलेलें व वाक्यपदीयकार भर्तृहरीने ब्रह्मपद दिलेलें स्फोटतत्त्व इतर दार्शनिकांना विवाद्य वाटलें, किंवा पाश्चात्त्य भाषातत्त्वज्ञांच्या दृष्टीने तर्काधिष्ठित व प्रयोगसिद्ध नसल्याने त्याज्य ठरलें, तरी भाषेच्या अर्थाशीं व पर्यायाने तो अर्थ जी भाषा व्यक्त करते त्या भाषेशीं आणि अखेर जें व्याकरण त्या भाषेचे प्रकृतिप्रत्ययादि तपासतें, त्या व्याकरणाशीं या स्फोटतत्त्वाचा फार निकटचा संबंध आहे एवढें खास; आणि म्हणूनच व्याकरणाच्या विचारांत भाषेच्या अर्थाचा व त्यामुळे तिच्यांत शिरूं पाहणाऱ्या शुद्धाशुद्धांचा विचारहि क्रमप्राप्तच आहे.

आज भाषेच्या निरनिराळ्या अंगांचीं स्वतंत्र अशीं शास्त्रें प्रगत होत आहेत. भाषेचा अर्थदृष्ट्या विचार करणारें ' शब्दार्थ-शास्त्र ' ( Semantics ) हें यांपैकी एक होय. परंतु भाषेंतील शब्दांचें कार्य केवळ Semantics म्हणजे शब्दार्थ देणारें नसतें, तर तें Grammatical म्हणजे व्याकरणीय अर्थ देणारेंहि असतें. उदा. ' घोडा ' हा शब्द उच्चारतांच एक विशिष्ट आकाराचा व विशिष्ट गुणधर्मांचा प्राणी लक्षांत येतो. परंतु ' घोडे ' या उच्चाराने त्यांच्या अनेकत्वाची कल्पना येते. ' वाचणें ' या शब्दाने एका विशिष्ट क्रियेची कल्पना येते. पण तेंच ' वाचलें ' या शब्दाने क्रिया भूतकाळीं झाल्याची कल्पना येते. अशीं आणखी किती तरी उदाहरणें देतां येतील. पण येथे मुख्य मुद्दा असा की, भाषेंतील शब्दांनाच नव्हे तर त्यांना होणाऱ्या विकारांनाहि अर्थ असतो; आणि म्हणून त्या विशिष्ट विकारांची व त्यांतून व्यक्त होऊं पाहणाऱ्या अर्थाची जर फारकत होऊं लागली तर तेथे प्रयोग चुकीचे झाले, म्हणजे अशुद्ध झाले असें म्हणावें लागेल. भाषेंत अर्थदृष्ट्याहि शुद्धाशुद्ध शिरूं शकतें तें या प्रकारें आणि व्याकरण हें भाषेचे रूढ नियम सांगत असल्याने व हे नियमहि कांही विशिष्ट अर्थ व्यक्त करण्याच्या प्रयत्नांतच तयार झालेले असल्याने, प्रयोगदृष्ट्या भाषेंत जें शुद्ध वा अशुद्ध असेल त्याचा विचारहि व्याकरणाला करावा लागेलच.

व्याकरण आणि भाषेंतील शुद्धाशुद्ध यांचा संबंध याप्रमाणे भाषेच्या अंतर्बाह्य स्वरूपाशीं निगडित आहे; आणि म्हणूनच व्याकरणज्ञानाने परभाषेंतीलच नव्हे, तर स्वभाषेंतील शुद्धाशुद्धाचा विवेक करणें सोपें जातें. शुद्धाशुद्धविवेक हें व्याकरणाच्या प्रयोजनांपैकी एक प्रमुख प्रयोजन आहे आणि हें प्रयोजनहि व्याकरणाचें स्वरूप ठरवावयाला कारण झालें आहे. व्याकरण आणि शुद्धाशुद्धविवेक यांचा संबंध अविभाज्य ठरतो तो यामुळे. ● ● ●

अनुक्रमणिका

# साहित्य-समीक्षा

## पिचलेलीं मनगटें

'To sing old songs with new delight' या कव्युक्तीप्रमाणे या लहान पुस्तकांत दीक्षित यांनी सर्वांस प्रिय वाटेल अशा सुंदर साहित्यिक शैलीने चंद, नेपोलियन, रावबाजी, चन्नमा, उमाजी, वासुदेव बळवंत फडके व मादाम कामा या सात स्वतंत्रतेच्या उपासकांच्या जीवनचरित्रांतील महत्त्वाच्या भागांच्या कथा निवेदन केल्या आहेत. या सात उपासकांपैकी दोन स्त्रिया व पांच पुरुष आहेत. स्त्रियांपैकी चन्नमा ही कर्नाटकाच्या इतिहासांतील असून कामा ही फ्रान्समध्ये वास्तव्य करून युरोपांत स्वराज्याची चळवळ चालविणारी भारतांतील पारशी स्त्री आहे. स्वातंत्र्यवीर सावरकर यांच्या चरित्रामुळे कामाची माहिती बऱ्याच सुशिक्षितांना आहे. परंतु चन्नमाची माहिती मात्र सर्वथैव अनोळखी व नवखी आहे. पुरुषांपैकी रावबाजी, उमाजी व वासुदेव बळवंत यांचीं चरित्रें महाराष्ट्रांत घरोघर माहीत आहेत. त्याचप्रमाणे नेपोलियन हा जगज्जेता म्हणून विख्यात असून चंदहि पृथ्वीराज चव्हाणाचा भाट म्हणून सर्वांना ठाऊक आहे. मात्र सर्वसाधारण जनांना त्याची तपशीलवार माहिती नाही. ती प्रथमच श्री. दीक्षित देत आहेत.

या चरित्रमालेंतील सातहि व्यक्तींना दुर्दैवाने स्वतःचें स्वातंत्र्य गमावून पारतंत्र्य पत्करावें लागलें आहे किंवा पारतंत्र्यांत जन्म घेऊन स्वातंत्र्यासाठी बलिदान करावें लागलें आहे. परंतु त्यांत त्यांना यश आलें नाही. म्हणून लेखकाने त्यांच्या पराक्रमी मनगटांना ' पिचलेलीं ' हें विशेषण हेतुपूर्वक योजिलें आहे. या व्यक्तींपैकी प्रत्येकीने स्वराज्य टिकविण्यासाठी किंवा परतंत्रता घालविण्यासाठी जे जे प्रयत्न केले, त्या त्या प्रयत्नांची करुण कहाणी दीक्षित यांनी अतिशय हृदयस्पर्शी रीतीने सांगितली आहे. ती वाचतांना कंठ गहिंवरल्याशिवाय राहत नाही.

मात्र या व्यक्तींच्या जीवनांत करुणा समान असली, तरी प्रत्येकीची कथा सर्वस्वीं स्वतंत्र आहे. सेंट हेलिना बेटावरील नेपोलियनचा नित्याचा कार्यक्रम आणि रावबाजींची बिठूर येथील दिनचर्या यांत जमीन-अस्मानाचा फरक आहे. नेपोलियनच्या राक्षसी महत्त्वाकांक्षेला पायबंद बसला, तरी प्रतिकूल परिस्थितींतहि ती उफाळत होती. उलट रावबाजींनी नित्य ब्राह्मणभोजनें घालण्यांत आणि देवाला नवीन नवीन माळ्यें वाहण्यांत आपलें उर्वरित आयुष्य निर्माल्यवत् करून टाकलें होतें. या दोन्ही कथा करुण खऱ्या, परंतु मनावर त्यांचे जे ठसे उमटतात, ते मात्र परस्परांपासून अगदी भिन्न असे. इतिहासाची पुनरावृत्ति होत असल्यामुळे त्यांपासून पुष्कळ शिकतां येण्यासारखें आहे !

मूळ इतिहासाला ढळ लागणार नाही व त्यांतला नीरस अंश बाजूला राहील अशा रीतीने या चरित्रकथा लिहिण्यांत दीक्षित यांना कल्पनातीत यश प्राप्त झालें आहे. तरी पण कांही चरित्रकथांतील त्यांची माहिती अद्ययावत् नाही. चंदाच्या माहितीसाठी ते लोकहितवादी यांच्या ग्रंथावर अवलंबून राहिले. तो ग्रंथ आता मागे पडला आहे. चंदाची अद्ययावत्

---

**पिचलेलीं मनगटें**–[ लेखक : म. श्री. दीक्षित; प्रकाशक : इनामदार बंधु, पुणें २; पृ. सं. ७८, मूल्य १॥ रुपया. ]

माहिती त्यांना गौरीशंकर हिराचंद ओझा, मुंशी देवीप्रसाद व कविवर श्यामलदान यांच्या नागरी प्रचारिणी पत्रिकेंतील ऐतिहासिक लेखांवरून मिळूं शकली असती. चंदचें नांव चंद्र. तो लाहोरचा ब्रह्मभट्ट. त्याचें कुल राजांची बिरुदावली गात असे. 'बिरुदा'वरूनच त्याच्या नांवाला 'बरदाई' हें उपपद चिकटलें आहे. 'पृथ्वीराज रासा' या त्याच्या ग्रंथाच्या अस्सलपणाबद्दल अजून संशोधकांत एकवाक्यता नाही. या ग्रंथांत पृथ्वीराज चव्हाणाच्या पराक्रमाच्या गाथेपेक्षा त्याच्या प्रेमविवाहांच्या कथाच अधिक आहेत. चंदाचा हा ग्रंथ अपूर्ण राहिला. तो पुढे त्याच्या मुलाने पूर्ण केला.

श्री. दीक्षित यांच्या लेखनांत चरित्र व कथा या दोन्ही साहित्यप्रकारांचें सुंदर संमिश्रण झालें आहे. चरित्र लिहितांना त्यांनी इतिहासांतील रूक्ष जंत्रीला फाटा दिला असून फक्त नायकाच्या व्यक्तित्वाला उठाव दिला आहे. त्याचप्रमाणे कथा सांगतांना शुष्क तपशील वगळला असून केवळ मुख्य मुद्द्यावर भर दिला आहे. त्यामुळे इतिहासांतलें ओज व कथेंतलें माधुर्य यांचें मोठें मनोहर मीलन त्यांच्या या चरित्रांत सहजगत्या घडलें आहे. त्यांचीं हीं चरित्रचित्रें आबालवृद्धांना आवडतील व उपकारक वाटतील यांत संशय नाही. ● ● ●

भ. श्री. पंडित

## तात्या टोपे

दोन वर्षांपूर्वी सत्तावनच्या स्वातंत्र्यसमरास एक शतक झालें; आणि यंदा १८ एप्रिल १९५९ रोजीं त्या समरांतले एक श्रेष्ठ सेनानी तात्या टोपे यांच्या बलिदानास शंभर वर्षें पूर्ण झालीं. त्या प्रसंगांच्या पुण्यस्मृतींनिमित्त श्री. दीक्षित यांनी 'सत्तावनचे सप्तर्षि' आणि 'तात्या टोपे' हीं दोन महत्त्वाचीं मौलिक पुस्तकें लिहिलीं. त्यांपैकी दुसऱ्या पुस्तकासंबंधींचे हे चार विचार आहेत.

'तात्या टोपे' या पुस्तकाचें स्वरूप चरित्रात्मक आहे. त्या दृष्टीने त्याला पूर्णपणा यावा म्हणून लेखक संशोधनाच्या क्षेत्रांतहि उतरले आहेत. तात्यांचें नांव, खरें उपनांव, त्यांचें घराणें व त्यांचें आप्तस्वकीय यांच्यासंबंधी लेखकांनी बरीच नवीन माहिती गोळा केली आहे. परंतु सत्तावनापूर्वींची तात्यांची माहिती फारशी उपलब्ध नसल्यामुळे, या पुस्तकाला चरित्रापेक्षा सत्तावनच्या इतिहासाच्या एका भागाचें स्वरूप प्राप्त झालें आहे. स्वराज्य प्राप्त झाल्यापासून अलीकडे सत्तावनच्या समरावर प्रकाश पडेल असें बरेचसें अस्सल साधनसाहित्य उपलब्ध झालें आहे. प्रस्तुत पुस्तक लिहितांना लेखकाने त्याचा बराच उपयोग केला आहे. त्यामुळे इतिहासदृष्ट्या त्यांच्या पुस्तकाचें महत्त्व वाढलें आहे.

सत्तावनचें समर नर्मदेच्या वर झालें. तेव्हा त्यासंबंधीची साधनसामग्री उत्तर प्रदेशांत, दिल्ली प्रांतांत व माळव्यांत विशेष प्रमाणांत आहे. इंग्रजी माहिती तर विपुल आहे. तेव्हा सत्तावनचा विचार करतांना त्या सर्व माहितीचा अभ्यास व परामर्श आवश्यक आहे. त्याशिवाय लेखन सर्वांगीण होणार नाही.

सत्तावनचें समर हें देशप्रेमाने प्रेरित होऊन झालें होतें किंवा ज्यांचे सरंजाम जप्त झाले होते त्यांच्या संतापांतून उफाळलें होतें याविषयीं इतिहासाच्या अभ्यासकांत तीव्र मतभेद आहेत. तात्या टोप्यांनी या समरांत उडी टाकली ती केवळ पेशव्यांचे एक एकनिष्ठ

**तात्या टोपे**–[ लेखक : म. श्री. दीक्षित, चित्रशाळा प्रकाशन, पुणें २; पृ. सं. ६२, किं. १ रुपया. ]

सेवक म्हणून; आणि त्याच दृष्टीने त्यांच्या चरित्राकडे पाहिलें पाहिजे. तात्यांशीं दोन हात करणाऱ्या इंग्रज सेनानींनी तात्यांचें नेतृत्व, त्यांचें संघटन, त्यांच्या हालचाली, त्यांचे पाचपेच, त्यांचा गनिमी कावा, त्यांचें साहस व त्यांचें शौर्य यांची मुक्तकंठाने स्तुति केली आहे. तात्यांसारखा शूर शिपाईगडी पारतंत्र्यांत जन्मास आला. त्यामुळे त्यांच्या ठिकाणीं असणाऱ्या क्षात्रतेजास जसा मिळावा तसा वाव मिळाला नाही. त्यांचा शेवट फंदफितुरीमुळे झाला. अशा या ब्रह्मकुलोत्पन्न अखेरच्या महाराष्ट्रीय सेनानीचें चरित्र लिहून श्री. दीक्षित यांनी इतिहासवाङ्मयांत महत्त्वाची व मोलाची भर घातली आहे.

प्रस्तुत चरित्र आकाराने लहान असलें, तरी लेखकाने कानपूर, झांशी, काल्पी व ग्वाल्हेर या ठिकाणीं तात्यांनी जो अतुल पराक्रम केला, त्याचा साधार वृत्तान्त दिला असून, तात्यांच्या हालचालींची कल्पना व्हावी म्हणून पुस्तकांत आरंभीं एक नकाशा दिला आहे आणि पुस्तकाच्या शेवटी निरनिराळ्या परिशिष्टांत बरीच महत्त्वाची माहिती संकलित केली आहे.

श्री. दीक्षित यांची भाषा प्रासादिक व प्रवाही असल्यामुळे आणि त्यांच्या निवेदन-पद्धतींत आकर्षकता असल्यामुळे या चरित्रांतील इतिहासहि हृदयंगम झाला आहे. ● ● ●

भ. श्री. पंडित

## विदूषक

संस्कृत नाटकांतील 'विदूषक' या विनोदी पात्राचा सांगोपांग विचार प्रकृत प्रबंधांत डॉ. गो. के. भट यांनी केला आहे. सदर प्रबंधाचें विवेचन दोन खंडांत केलेलें असून पहिल्यांत विदूषकाची कुळकथा सांगितली आहे; आणि दुसऱ्यांत विदूषकांच्या मेळाव्याचें वर्णन दिलें आहे. विदूषकाच्या कुळकथेंत पुढील विषयांची सोपपत्तिक व साग्र चर्चा आहेः— विदूषकाचें मूळ, त्याचा विकास, त्याचें सोंग, जात, त्याची भोजनप्रियता आणि भाषा, नांव, गुण, भेद, त्याची भूमिका आणि कार्य, विनोदाचें सर्वसामान्य स्वरूप व विदूषकाचा विशिष्ट विनोद आणि विदूषकाच्या अवनतीची मीमांसा.

विदूषकांच्या मेळाव्यांत भासकालिदासादि संस्कृत नाटककारांच्या कलाकृतींत येणाऱ्या व प्राकृत सट्टकांत रेखाटलेल्या एकूण सोळा विदूषकांचीं स्वभावचित्रें सविस्तर देण्यांत आलेलीं आहेत. सदर प्रबंध डॉ. भटांच्या संशोधनवृत्तीचा, त्यांच्या व्यासंगाचा आणि रसिकतेचा एक सुंदर नमुना आहे; आणि या त्यांच्या तिन्ही गुणांचा उत्तम परिपाक या प्रबंधाच्या पहिल्या खंडांत प्रकर्षाने दृष्टीस पडतो. विदूषकाचें मूळ शोधण्यांत त्यांनी डॉ. कीथ वगैरे पंडितांच्या उपपत्तीचें मार्मिक खण्डन केलें असून आपली नवी उपपत्ति प्रतिपादिली आहे. त्यांच्या मतें संस्कृत नाट्याचा आरंभ देवासुरद्वंद्वाच्या प्रदर्शनाने झाला आहे. अशा नाट्यांत असुरपात्राचें विकृत आणि हास्यकारक सोंग काढण्यांत विनोदनिर्मिति होत असे. म्हणून असल्या प्राचीन आणि प्राथमिक देवासुर-नाटकांतील असुरांचा वारसा म्हणजे विदूषक होय. कारण विदूषकाचें विकृतत्व असुराच्या सोंगामधून आलेलें आहे. पुढील अवस्थेंत नाट्याचें स्वरूप प्रायः देवताविषयकच राहिलें. अशा वेळीं देव-नायकाचा सहचर म्हणून नारदासारखें पात्र

**विदूषक**—[ लेखक : डॉ. गो. के. भट, एम्. ए., पीएच्. डी.; प्रकाशक : गो. वा. कुलकर्णी, महाराष्ट्र ग्रंथ भांडार, महाद्वार रस्ता, कोल्हापूर १; मूल्य ९ रु. ५० न. पैसे, पृष्ठें ४५० ]

नाटकांत आणणें सुलभ झालें. भरताने वर्णिलेला पहिला विदूषक म्हणजे नारद असें म्हणायला हरकत नाही (पृ. ५९). ' संस्कृत रंगभूमीवरील पहिला विदूषक म्हणजे नारद होय ' (पृ. १३ प्रस्तावना). थोडक्यांत सांगावयाचें तर विदूषकाचा उगम, डॉ. भटांच्या मतें, असुरांचें विकृतत्व आणि नारदाचा कळलावेपणा यांत आहे.

विदूषकाची भूमिका आणि कार्य यावरील दहावें व अकरावें अशीं दोन प्रकरणें ग्रंथकाराच्या रसिकतेची साक्ष देतात. यांत वर्णिलेलीं विदूषकाचीं बहुतेक कार्यें अगदी नवीन नसलीं तरी नाट्यनिवेदन, कथाविकास, जीवनभाष्य इत्यादि कार्यें त्याने फार मार्मिकपणें उकलून दाखविलीं आहेत. विनोदचर्चा मूलगामी असून, विदूषकाच्या विशिष्ट विनोदाचें परीक्षणहि समर्पक वाटतें.

' विदूषकांचा मेळावा ' हा दुसरा खंड. यांत भासापासून तों १७ व्या शतकापर्यंतच्या संस्कृत–प्राकृत नाटकांतील सोळा विदूषकांच्या स्वभावांची उत्तम छाननी केली आहे. प्रत्येक विदूषकाचें वेगळें वैशिष्ट्य दर्शविणारें त्या त्या नाटकांतीलच वाक्य वेंचून देण्यांत डॉ. भटांनी मार्मिकता व्यक्त केली आहे. मालविकाग्निमित्रांतील गौतम, मृच्छकटिकांतील मैत्रेय, अविमारकांतील संतुष्ट इत्यादि व्यक्तिरेखा फार सुंदरपणें रेखाटण्यांत आल्या असून, मधून मधून केलेलें तुलनात्मक विवेचनहि मोठें उठावदार आहे. अर्थात्, या खंडांतील विवेचनांत पहिल्या खंडांतील मजकुराची द्विरुक्ति झाली आहे, पण ती अपरिहार्य होती. कारण तीवाचून प्रत्येक विदूषकाचें समग्र व्यक्तिमत्त्व स्वतंत्रपणें वाचकांसमोर उभें करतां आलें नसतें.

सारांश, ' विदूषकाबद्दलचें सर्व कांही ' असें सदर प्रबंधाचें सर्वसमावेशक व सर्वांगपरिपूर्ण स्वरूप असून, यामुळे मराठी वाङ्मयांत एक मोलाची भर पडली आहे यांत संशय नाही. सदर अपूर्व ग्रंथाचा एवढा धावता परिचय करून दिल्यानंतर त्यांतील थोड्या मतभेदाचा निर्देश करतों. हा मतभेद विदूषकाच्या उगमाबाबत आहे. डॉ. भटांना विदूषकाचें मूळ राक्षसांच्या विकृतत्वांत आणि नारदाच्या कळलावेपणांत दिसतें. पण संस्कृत नाटकांत येणारीं राक्षसपात्रें प्रायः भयानक, रौद्र किंवा बीभत्स रस उत्पन्न करणारीं असतात. हास्याशीं त्यांचा संबंध नसतो. शिवाय सौम्यपणा, प्रेमळपणा, मित्रेपणा इत्यादि विदूषकाचे गुण तर राक्षसस्वभावाशीं विरुद्धच आहेत. त्यामुळें राक्षस व विदूषक यांचा संबंध उगमाशींसुद्धा जोडणें फार विसंगत वाटतें. तीच गोष्ट नारदाची आहे. देव-नायकाच्या विदूषकांत आणि नारदांत कांही साम्य दिसतें यावरून नारदाच्या विदूषकत्वाचा डॉ. भटांनी नुसता तर्क केलेला आहे. नारदाचें उच्च स्थान व त्याच्याबद्दलची आदराची किंवा भक्तीचीहि भावना लक्षांत घेतली तर येथेहि वरीलसारखी विसंगति वाटते. अशी विसंगत नवी उपपत्ति लावण्यापेक्षा विदूषकाचें मूळ सामाजिक किंवा मानसशास्त्रीय कारणांत शोधणेंच बरें.

प्रा. परेख यांनी विदूषक हें प्रातिनिधिक पात्र आहे का केवळ कृत्रिम, असा मुद्दा उपस्थित केला आहे तें विचारसूत्र घेऊन तलास केल्यास विदूषकाचें मूळ बव्हंशीं सामाजिक परिस्थितींत सांपडावें असें वाटतें. धार्मिक परिस्थितींत निदान विदूषकाचें तरी मूळ शोधणें फलप्रद होणार नाही.

असो; सदर ग्रंथ सामान्य मराठी रसिक वाचकांना रोचक तर वाटेलच, पण व्यासंगी संशोधकांनासुद्धा तो प्रेरक वाटेल यांत शंका नाही. असा सर्वांगपरिपूर्ण ग्रंथ लिहिल्याबद्दल डॉ. भटांचें अभिनंदन करून हें समीक्षण संपवितों. ● ● ●

**के. ना. वाटवे.**

# परिषद्वार्ता

( चिटणिसांकडून )

**सभासदांस विनंती:**—परिषदेचें नवें वर्ष १ एप्रिलला सुरू झालें. घटनानियमाप्रमाणे साधारण सभासदांनी आपली वर्गणी पहिल्या तिमाहींत भरावयाची असते. म्हणून साधारण सभासदांना अशी विनंती आहे की, त्यांनी आपली वर्गणी रु. ३·०० ( मागील बाकी असल्यास तीसह ) सत्वर पाठवावी.

**स्मृतिदिन:**—ज्ञानकोशकार **डॉ. श्री. व्यं. केतकर** यांच्या स्मृतिदिनानिमित्त दि. १० एप्रिलला सकाळीं कै. केतकरांच्या समाधीला पुष्पांजलि वाहण्यांत आली व सायंकाळीं डॉ. द. न. गोखले यांचें ' केतकरांच्या बौद्धिक शक्तींची तऱ्हा ' या विषयावर अभ्यासपूर्ण व्याख्यान झालें.

सुप्रसिद्ध विनोदी लेखक व नाटककार कै. श्रीपाद कृष्ण कोल्हटकर यांचा २५ वा स्मृतिदिन १ जून रोजीं साजरा केला जावा असा आदेश कार्यकारी मंडळाने सर्व साहित्य-संस्थांना दिला होता. त्यानुसार महाराष्ट्र साहित्य सभा, इंदूर; करवीर नगर वाचन मंदिर, कोल्हापूर; महाराष्ट्र समाज, अहमदाबाद; राजाराम वाचनालय, नागपूर; मुंबई मराठी ग्रंथ-संग्रहालय, मुंबई २ इत्यादि संस्थांनी चर्चा-व्याख्यानें घडवून हा स्मृतिदिन साजरा केला. म. सा. परिषदेतर्फे पुणें येथे या दिवशीं श्री. ग. त्र्यं. माडखोलकर व डॉ. रा. शं. वाळिंबे यांचीं व्याख्यानें झालीं. श्री. बबनराव नावडीकर यांनी समारंभाच्या आरंभीं श्रीपाद कृष्णांचें 'महाराष्ट्र-गीत' गाऊन दाखविलें.

**प्रा. क्षीरसागर यांचा सत्कार:**—मिरज-संमेलनाच्या अध्यक्षपदीं सुप्रसिद्ध सौंदर्यवादी टीकाकार प्रा. श्री. के. क्षीरसागर यांची निवड झाल्याबद्दल परिषदेतर्फे दि. १९ एप्रिलला त्यांचा सत्कार करण्यांत आला. सभेच्या अध्यक्षस्थानीं कार्याध्यक्ष श्री. य. दि पेंढरकर होते. श्री. गोपीनाथ तळवळकर, प्रा. भ. श्री. पंडित, श्री. वा. रा. ढवळे, श्री. शंकर सारडा, डॉ. सरोजिनी बाबर, प्रा. हे. वि. इनामदार व डॉ. दु. का. संत यांनी आपल्या भाषणांत प्रा. क्षीरसागरांच्या व्यक्तिगत व वाङ्मयीन गुणांचें वर्णन केलें. उत्तरादाखल प्रा. क्षीरसागर यांनी भाषण केलें. श्री. यशवन्त यांच्या समारोपाच्या भाषणानंतर श्री. मो. रा. वाळंबे यांनी आभार मानले व समारंभ संपला.

**संमेलन:**—मराठी साहित्य संमेलनाचें ४१ वें अधिवेशन स्नेहसंवर्धक संघ या संस्थेतर्फे मिरज येथे दि. १६ ते १९ मे १९५९ या अवधींत प्रा. श्री. के. क्षीरसागर यांच्या अध्यक्षतेने यशस्वीरीत्या पार पडलें. प्रतिनिधिनिवास, भोजन इत्यादींची सोय मिरज हायस्कूलमध्ये करण्यांत आली होती व संमेलनाचे महत्त्वाचे सर्व कार्यक्रम हायस्कूलसमोर उभारण्यांत आलेल्या ' इतिहासाचार्य वासुदेवशास्त्री खरे सभामंडपां'त झाले. दि. १६ ला सकाळीं पूर्वाध्यक्ष श्री. आ. रा. देशपांडे, नियोजित अध्यक्ष प्रा. श्री. के. क्षीरसागर व

उद्घाटक राज्यपाल श्री. न. वि. तथा काकासाहेब गाडगीळ यांचें मिरज स्थानकावर स्वागतमंडळातर्फे स्वागत करण्यांत आलें. सकाळीं १० वाजतां म. म. प्रा. द. वा. पोतदार यांच्या हस्तें टाउन हॉलमधील प्रदर्शनाचें उद्घाटन करण्यांत आलें. दुपारीं ५ वाजतां संमेलनास रीतसर प्रारंभ झाला. स्वागतगीत, संदेशवाचन, उद्घाटन, स्वागताध्यक्ष व अध्यक्ष यांचीं भाषणें इत्यादि कार्यक्रम वादळी वातावरण असूनहि सुरळीतपणें पार पडले. रात्रीं ' एक होता म्हातारा ' या नाटकाचा प्रयोग मिरजेच्या कलाविकास मंडळाने सादर केला. दि. १७ ला सकाळीं विषय-नियामक समितीची बैठक झाल्यानंतर मंडपांत ' विज्ञान आणि साहित्य ' या विषयावर श्री. वा. रं. सुंठणकर यांच्या अध्यक्षतेने परिसंवाद झाला. परिसंवादांत प्रा. रामभाऊ जोशी, प्रा. अनंत काणेकर, प्रा. दि. के. बेडेकर व डॉ. गो. के. भट यांनी भाग घेतला होता. दुपारीं ५ वाजतां खुलें अधिवेशन भरून दुखवटा—ठराव व अध्यक्षांच्या हस्तें ग्रंथप्रकाशन हे कार्यक्रम झाले. रात्रीं पुण्याच्या प्रो. ड्रॅ. असोसिएशनने ' वेड्याचें घर उन्हांत ' हा लोकप्रिय नाट्यप्रयोग सादर केला. दि. १८ ला सकाळीं विषय-नियामक समितीची बैठक पुन्हा भरली होती. १० वाजतां पद्मभूषण श्री. मामासाहेब वरेरकर व नटवर्य श्री. चिंतामणराव कोल्हटकर यांचा सत्कार करण्यांत आला. या प्रसंगीं श्री. व. ब. आगाशे, श्री. द. रा. गोमकाळे व प्रा. माधव मनोहर यांनी प्रसंगोचित भाषणें केलीं. याच ओघांत श्री. वरेरकर यांचें " तरुण लेखकांशीं हितगुज " ह्या स्वरूपाचें व्याख्यान झालें. दुपारीं खुल्या अधिवेशनांत संयुक्त महाराष्ट्र, गोमंतक, मोडी लिपी इत्यादि ठराव संमत झाले. श्री. श्री. शं. नवरे, श्री. बा. रं. सुंठणकर, श्री. विश्वनाथ लवंदे, कॉ. विनायक भावे, श्री. वि. द. घाटे, श्री. कृ. भा. बाबर, प्रा. ऊर्ध्वरेषे इत्यादि वक्तयांनी ठरावांवर वैशिष्टयपूर्ण भाषणें केलीं. त्यानंतर काव्यगायनाचा कार्यक्रम झाला. कार्यक्रमाचें स्वरूप श्री. वि. स. खांडेकर यांनी विशद केल्यानंतर कवि यशवन्त, अनिल, काणेकर, काळेले व विन्दा करंदीकर यांनी आपल्या निवडक पांच पांच कविता गाऊन दाखविल्या. रात्रीं स्थानिक कलावंतांचे नाट्यप्रवेश व श्री. सुधीर फडके यांचें गीतरामायण हे मनोरंजक कार्यक्रम झाले. दि. १९ ला सकाळीं ९ वाजतां ' मराठी निबंध : काल, आज व उद्या ' या विषयावर डॉ. वि. भि. कोलते यांच्या अध्यक्षतेने परिसंवाद झाला. या प्रसंगीं प्रा. ह. श्री. शेणोलीकर, प्रा. मनोहर आळतेकर, प्रा. भगवन्त देशमुख, डॉ. दु. का. संत यांचीं भाषणें झालीं. यानंतर नवोदित कवींच्या काव्यगायनाचा खास कार्यक्रम झाला. सायंकाळीं ५ वाजतां म. म. प्रा. पोतदार यांचें ' इतिहासांतील महाराष्ट्रीय ' या विषयावर तासभर उद्बोधक व्याख्यान झालें. नंतर ६ वाजतां अध्यक्षांचें समारोपाचें भाषण झालें. याच वेळीं प्रतिनिधींतर्फे व म. सा. प. च्या वतीने श्री. श्री. शं. नवरे व सौ. कमलाबाई किंबे यांचीं व स्वागतमंडळातर्फे स्वागताध्यक्ष श्री. वि. स. खांडेकर आणि कार्यवाह श्री. व. ब. आगाशे यांचीं भावपूर्ण अशीं आभारप्रदर्शक भाषणें झालीं. ' वंदे मातरम् ' गीतानंतर चार दिवस चाललेला हा भरगच्च साहित्यसोहळा समाप्त झाला.

संमेलनासाठी बाहेरगावांहून सुमारें ५०० प्रतिनिधि आले होते. त्यांची निवासभोजनाची सोय स्वागतमंडळाने उत्तमप्रकारें ठेवली होती. संमेलन यशस्वी करण्यांत अनेकांचें साहाय्य झालेलें आहे. तथापि स्वागताध्यक्ष श्री. भाऊसाहेब खांडेकर, कार्याध्यक्ष श्री. पुंडलिकजी कातगडे, कार्यवाह श्री. म. द. करमरकर, श्री. व. ब. आगाशे, श्री. क. श्री. काळे, श्री. वि. गो. साठ्ये, श्री. कुसुमावती पंडितराव यांनी अहोरात्र केलेल्या परिश्रमांचा

आवर्जून उल्लेख केला पाहिजे. संमेलनाच्या कार्यकर्त्यांशीं सल्लामसलत व मार्गदर्शन करण्यासाठी म. सा. प. चे कार्याध्यक्ष श्री. य. दि. पेंढरकर हे आधीपासून मिरजेस जाऊन राहिले होते.

या संमेलनांत जे ठराव संमत झाले ते व साहित्यसंस्था-संघीकरण-समितीने सर्वसंमत केलेला खर्डा याच अंकीं अन्यत्र देण्यांत आला आहे. **आगामी संमेलन मराठी ग्रंथसंग्रहालय, ठाणें या संस्थेच्या वतीने ठाणें येथे भरणार आहे.**

**भेट व सत्कारः**—पुणें नभोवाणीच्या कविसंमेलनासाठी आलेल्या हिंदी कवींनी खास निमंत्रणावरून शनिवार दि. २७ जूनला परिषदेस भेट दिली. या वेळीं श्री. केदार नाथसिंह ( अलाहाबाद ), श्री. गोपालसिंग नेपाली ( मुंबई ), श्री. गोपालदास नीरज ( मुंबई ), श्री. राजनारायण बिसारिया ( जयपूर ), श्री. देवराज दिनेश ( दिल्ली ), श्री. श्रीनिवास जोशी ( पुणें ) इत्यादि कवि उपस्थित होते. पुण्यांतील कांही नामांकित कवीहि या वेळीं उपस्थित होते. परिचय, काव्यगायन इत्यादि कार्यक्रम झाल्यावर हिंदी कवींचा परिषदेतर्फे सत्कार करण्यांत आला.

**सभाः**—परिषदेच्या नियामक व वार्षिक साधारण सभांच्या बैठकी रविवार दि. १४ जूनला प्रा. श्री. के. क्षीरसागर यांच्या अध्यक्षतेने मा. प. सभागृहांत भरल्या होत्या. दुखवटा ठराव, ५७-५८ चें इतिवृत्त, जमाखर्च व ५९-६० चा अर्थसंकल्प संमत करण्यांत आला. इतिवृत्ताचीं मुद्रितें काळजीपूर्वक तपासलीं जावींत ही सूचना मान्य करण्यांत आली. 'पत्रिके' चें स्वरूप व तिचें विलंबाने होणारें प्रकाशन या मुद्द्यांची नोंद करण्यांत आली. हिशेबाची पद्धति सर्वसामान्य सभासदांच्या दृष्टीने सोईची व सुगम कशी करतां येईल याचा विचार करण्यासाठी एक समिति नेमण्यांत आली. अतिथिगृहाची आवश्यकता व त्यासाठी लागणारा खर्च या दोन बाबींवर विशेष चर्चा झाली. श्री. ग. गं. जांभेकर, प्रा. अ. गं. मंगरूळकर, श्री. वि. त्र्यं. शेटे, श्री. म. गो. मोडक, श्री. पां. र. अंबिके, प्रा. दे. द. वाडेकर, डॉ. न. का. घारपुरे, श्री. वा. रा. ढवळे, डॉ. वा. दा. गोखले, कार्याध्यक्ष श्री. य. दि. पेंढरकर इत्यादींनी निरनिराळ्या बाबींवरील चर्चेत भाग घेतला. शेवटीं प्रा. वाडेकर यांनी मांडलेला अतिथिगृहाचा ठराव बहुमताने संमत झाला. यानंतर सभा तहकूब झाली व कार्यक्रमपत्रिकेवरील उर्वरित विषय पुढच्या सभेंत चर्चेला घेण्याचें ठरलें.

---

अनुक्रमणिका

( पान ४ वरून पुढे चालू )

नांवाची एक नवीन संस्था स्थापन करण्यांत आली आहे. या संस्थेचें बाळंतपण इंदूर येथील कान, नाक व गळा यांचे विशेष तज्ज्ञ डॉ० **जयराम गणेश ऊर्फ अप्पासाहेब ठाकूर** यांच्या नेतृत्वाने झालें. डॉ. ठाकूर हे इंदूरच्या सांस्कृतिक व साहित्यविषयक जीवनांत विशेष उत्साहाने लक्ष घालीत आले आहेत. त्यामुळे इंदूर येथील प्रा. ग. वा. कवीश्वर, श्री. रामभाऊ दात्ये, श्री. मधुसूदन उपासनी वगैरे साहित्यप्रेमी मंडळींनी त्यांच्या सहकार्याचा फायदा घ्यावा हें साहजिकच होय. या नवीन संस्थेचे अध्यक्ष श्री रामभाऊ दात्ये हे असून श्री. उपासनी एक कार्यवाह आहेत. या संस्थेच्या कार्यकारिणींत जबलपूर येथील डॉ. प्र. ना. कवठेकर व भोपाळचे प्रा. ना. ल. वैद्य वगैरे मंडळी आहेत. इंदूरच्या होळकर कॉलेजांतील तत्त्वज्ञानाचे ख्यातनाम प्राध्यापक ग. वा. कवीश्वर यांच्या अविरत प्रयत्नामुळेच प्रामुख्याने ही संस्था जन्मास आली असून, त्यांचेंहि कुशल मार्गदर्शन या संस्थेला होत आहेच. अर्थात्, ही नवीन संस्था मध्यप्रदेशांतील मराठी भाषा व वाङ्मय यांच्या अभ्यासाला व संशोधनाला चालना व प्रेरणा देईलच, पण शिवाय मराठी साहित्य महामंडळावरील आपल्या प्रतिनिधित्वाचा योग्य तो वांटा उचलून, अखिल मराठी भाषिकांच्या मध्यवर्ती संस्थेच्या कार्यांचा गाडा पुढे नेण्यास सहकार्य देईल अशी आशा करावयास हरकत नाही. अलीकडेच मध्यप्रदेश सरकारचे मुख्य मंत्री डॉ. कैलासनाथ काटजू यांनी एका भाषणांत महाराष्ट्राच्या राष्ट्रीय वृत्तीची प्रशंसा करून मध्यप्रदेशांत मराठी भाषिकांचा अंतर्भाव होणें म्हणजे प्रगतीच्या बीजांचा अंतर्भाव होणें होय असे उद्गार काढलेले असल्यामुळे, या नवीन साहित्य परिषदेला तेथील सरकारचें सहकार्य व जरूर तें आर्थिक साहाय्य मिळेल अशी अपेक्षा आहे. मी या नवीन संस्थेच्या चालकांचें अंतःकरणपूर्वक अभिनंदन करून संस्थेच्या कार्याला सुयश चिंतितों. ● ● ●

**वा. रा. ढवळे**

मराठी साहित्य संमेलन ४१ वें अधिवेशन, मिरज.

# संमत झालेले ठराव

## १ दुखवटा

गतवर्षी निधन पावलेल्या पुढील व्यक्तींबाबत हें संमेलन दुखवटा व्यक्त करीत आहे.

श्री. नागेश जोशी, सौ. अनसूयाबाई काळे, श्री. मा. के. काटदरे, श्री. रामभाऊ मंडलिक, डॉ. बाबासाहेब जयकर, श्री. ज. स. करंदीकर, श्री. य. रा. गुप्ते, श्री. वि. ज. सहस्रबुद्धे, प्रा. स. सी. भावे, प्रा. शं. दा. चितळे, श्री. काशिनाथराव वैद्य, डॉ. के. जी. गोसावी, श्री. मुकुंदराव आंबेडकर, श्री. विठ्ठलराव चंदावरकर, डॉ. डी. पी. गोडें, श्री. ध. रा. विन्हाडे.

अध्यक्षांकडून

म. सा. परिषदेचे भूतपूर्व चिटणीस रावसाहेब **र. लु. जोशी** व प्रा. **गं. भा. निरंतर** यांच्या शोचनीय निधनाबद्दल या संमेलनात अत्यंत खेद होत आहे. खिस्तवासी रावसाहेब जोशी यांनी कांही काळ परिषदेचें कार्याध्यक्षपदहि भूषविलें होतें. त्यांनी आपल्या मनमिळाऊ स्वभावाने परिषदेची अनेक वर्षे विधायक सेवा केली असून परिषदेला लोकप्रियहि केलें. कै. निरंतर हे अनेक वर्षे कार्यकारी मंडळाचे सदस्य व चिटणीस होते. उभयतांच्या निधनाने परिषदेची फार मोठी हानि झाली आहे. हें संमेलन या दोघांच्या सेवेचा कृतज्ञतापूर्वक उल्लेख करीत आहे व त्यांना श्रद्धांजलि वहात आहे.

अध्यक्षांकडून

झुंजार योद्धे, बहुजन समाजाचे पंचप्राण व ग्रामीण शिक्षणाचे कर्णधार पद्मभूषण कर्मवीर डॉ. भाऊराव पाटील यांच्या आकस्मिक निधनाने अखिल महाराष्ट्राची न भरून येणारी हानि झालेली आहे. स्वावलंबन आणि सहजीवन या दोन मंत्रांच्या साहाय्याने कर्मवीरांनी महाराष्ट्रांतील ग्रामीण शिक्षणामध्ये आमूलाग्र क्रांति केली, आणि त्या क्षेत्रांत अनेक प्रयोग यशस्वी करून दाखविले. शिक्षणाचें लोण समाजाच्या अत्यंत खालच्या थरापर्यंत पोचवून सामान्य लोकांच्या आकांक्षांना नवीं क्षितिजें कर्मवीरांनी दाखविलीं. अशा थोर समाजसेवकाच्या निधनाबद्दल या संमेलनास तीव्र दुःख होत आहे.

सूचक–वि. द. घाटे
अनुमोदक–चंद्रकुमार डांगे

## २ संयुक्त महाराष्ट्राच्या मागणीचा पुनरुच्चार

राज्यांची पुनर्घटना करतांना केंद्र सरकारने अन्य भाषाभाषिकांना स्वतंत्र राज्यें देऊन, मराठी व गुजराती भाषिकांना तें नाकारण्यांत त्यांच्यावर घोर अन्याय व पक्षपात

केलेला आहे, याबद्दल या मराठी साहित्य संमेलनाला पुन्हा खेद प्रदर्शित करणें आवश्यक वाटतें.

महाराष्ट्राच्या सीमाप्रदेशांपैकी फार मोठा भाग जनतेच्या इच्छेविरुद्ध शेजारच्या अन्य भाषिक राज्यांत घालून तर या अन्यायाची परमावधि झालेली आहे. या अन्यायाविरुद्ध, विशेषत: म्हैसूर राज्यांत गेलेल्या मराठी भाषिकांनी सनदशीर, शांततामय व लोकशाही मार्गाने कौतुकास्पद लढा चालवून राज्यकर्त्यांचें व जनतेचें लक्ष या प्रश्नाकडे तीव्रतेने खेचलें. पाटसकर-निवाड्यांतील सलगता व गाव हे घटक रू न तेथील लोकमताला मान देण्याच्या तत्त्वांना अनुसरून हा प्रश्न सहज सोडविणें शक्य असतांना, झोनल कौन्सिलने आणि केंद्र सरकारने आज महिनेच्या महिने तो कुचंबत ठेवून त्या भागांतील मराठी भाषिकांची मोठी कुचंबणा चालविली आहे, याबद्दल या संमेलनाला उद्वेग वाटतो. या योगाने जनतेंतील वैफल्याची भावना दिवसेंदिवस वाढत जाणें देशाच्या स्थैर्याच्या व लोकशाहीच्या प्रतिष्ठेच्या दृष्टीने इष्ट नव्हे.

म्हणून हें संमेलन पुन्हा अशी आग्रहाची मागणी करीत आहे की, मुंबईसह सर्व सलग मराठी प्रदेशाचें नागपूर-करारानुसार एकराज्य ताबडतोब निर्माण करण्यांत यावें. त्याशिवाय या संमेलनाचें कधींहि समाधान होणार नाही किंवा हें संमेलन इतर कोणताहि पर्याय मान्य करणार नाही.

( एक विरुद्ध प्रचंड बहुमताने संमत ) अध्यक्षांकडून

## ३ गोमंतकविषयक

भारतापासून गोमंतकाची संपूर्णपणें ताटातूट करून त्याला प्रतिपोर्तुगीज बनवून टाकण्याचा जो आटोकाट प्रयत्न आज शेकडो वर्षे पोर्तुगीज सरकारने सतत चालवला आहे त्यांत अलीकडे एका फार जालीम उपाय-योजनेची भर घालण्यांत आली असून, त्यामुळे गोमंतकांतील ६० टक्के हिंदु बांधव अगदी हवालदिल होऊन गेले आहेत. पोर्तुगीज सरकारने जारी केलेली ही नवी उपाय-योजना म्हणजे ७ ते १३ वर्षांपर्यंत वयाच्या मुलांना सक्तीने पोर्तुगीज शिक्षण घ्यायला भाग पाडणारा अघोरी कायदा होय. ह्या नवीन कायद्यामुळे १३ वर्षांपर्यंतच्या मुलांना मराठी शाळांत जातांच येणार नाही अशी अनवस्था परिस्थिति निर्माण झाली असून, त्यामुळे आपल्या गोमंतकीय बंधूंवर फार मोठें सांस्कृतिक गंडांतर आलें आहे.

या परिस्थितींत, हें अधिवेशन गोमंतकीय मराठी भाषिकांबद्दल पूर्ण सहानुभूति दर्शवीत असून, त्याबरोबरच पोर्तुगीज सरकारचा निःसंदिग्ध शब्दांत निषेध करीत आहे. गोमंतकाचें स्वातंत्र्य सिद्ध होऊन तो भारतांत पुनरपि एकजीव व्हावा या अर्थाचे ठराव या संमेलनाने आजवर संमत केलेले आहेत. त्यांचा हें अधिवेशन पुनरुच्चार करीत असून, हें कार्य शक्य तितक्या लवकर घडवून आणावें अशी भारत सरकारला आग्रहाची विनंती करीत आहे.

( एकमताने संमत )

सूचक—व्ही. एन्. लवंदे
अनुमोदक—विनायक भावे
बा. रं. सुंठणकर

## ४ मोडी लिपीला उत्तेजन

मोडी लिपी ही मराठी भाषेशीं संलग्न असून ऐतिहासिक कागदपत्रें—म्हणजे सनदा, इनामपत्रें, बखरी वगैरे महत्त्वाचे कागदपत्र मोडी लिपींत आहेत व ते महाराष्ट्रभर विखुरलेले आहेत. जलद लिहिण्याच्या दृष्टीने तिचें महत्त्व सिद्ध झालेलें आहे. शिवशाहींत, पेशवाईत व इंग्रजी राजवटींतहि तिला राजदरबारी मानाचें स्थान होतें व ती व्यवहारांत चालू होती. अशा उपयुक्त लिपीस सरकारने उत्तेजन द्यावें अशी या संमेलनाची शिफारस आहे.

( बहुमताने संमत ) सूचक—व. गो. कुलकर्णी
अनुमोदक-रा. व. जामदार

## ५ संमेलनाध्यक्षांची निवडणूक

ज्या अर्थीं मराठी साहित्य संमेलनाच्या अध्यक्षपदाच्या निवडणुकीच्या पद्धतींत कांही दोष उत्पन्न झाल्याचें दिसून येत आहे त्या अर्थीं महाराष्ट्र साहित्य परिषदेने ह्या गोष्टीचा विचार करण्यासाठीं एक तात्पुरती समिति नेमावी व त्या समितीने ह्या गोष्टीचा विचार करून पुढील साहित्य संमेलनापुढे आपलें निवेदन सादर करावें अशी या अधिवेशनाची विनंती आहे.

( बहुमताने संमत ) सूचक-श्री. शं. नवरे
अनुमोदक-आ. रा. देशपांडे ( अनिल )

## ६ ग्रंथपुरस्कारासंबंधी

मुंबई राज्याकडून प्रतिवर्षी वाङ्मयाच्या भिन्न भिन्न शाखांमधील ग्रंथांना पुरस्कार दिला जातो ही आनंदाची गोष्ट असून, याबद्दल हें संमेलन सरकारचें अभिनंदन करीत आहे. पुरस्कारास योग्य अशा ग्रंथांची निवड करण्यासाठी सरकारने जी कार्यपद्धति व ज्या कसोट्या अवलंबिल्या आहेत त्या स्पष्ट केलेल्या नसून, त्यासंबंधांत प्रातिनिधिक व सर्वमान्य अशा साहित्यसंस्थांचें सहकार्य घेण्यांत येत नाही ही मोठी उणीव आहे. तेव्हा सरकारने या संबंधांत महाराष्ट्र साहित्य परिषदेचें ( आणि मराठी मुलखांतील इतर प्रातिनिधिक सर्वमान्य साहित्यसंस्थांचें ) सहकार्य घ्यावें आणि या संस्थांनी नामनिर्देशित केलेल्या व्यक्तींमधून ग्रंथपरीक्षकांची निवड करावी, अशी हें संमेलन मागणी करीत आहे.

( बहुमताने संमत ) सूचक—कृ. पां. कुलकर्णी
अनुमोदक—शं. रा. सोमण

## ७ रंगभूमीसंबंधी

जनतेच्या आदरास पात्र झालेल्या श्रेष्ठ व्यक्तींचें विकृत चित्रण, हीन अभिरुचि व्यक्त करणारें लेखन आणि अभिनय, केवळ तंत्राच्या आहारीं जाऊन केली जाणारी अभिजात नाट्यकलेची पायमल्ली, कंत्राटी पद्धतीने केल्या जाणाऱ्या प्रयोगांतील कलागुणांचा अभाव, अशा तऱ्हेच्या अनेक घटना आज मराठी रंगभूमीवर घडत आहेत, ही खेदाची गोष्ट असून त्यामुळे मराठी रंगभूमीची हानि होत आहे. म्हणून हें संमेलन सर्व नाट्यलेखकांना व रंगभूमीशीं संबंधित असलेल्या कलाकारांना अशी आग्रहाची विनंती करीत आहे की,

वरील प्रकारांना त्यांनी आळा घालावा व मराठी रंगभूमीच्या उज्ज्वल परंपरेचा वारसा पुढे चालवावा.

( बहुमताने संमत )

सूचक–गो. म. वाटवे
अनुमोदक–चंद्रकुमार डांगे

## ८ कै. देवल स्मारक

सुप्रसिद्ध नाटककार कै. गो. ब. देवल यांचें नाट्यलेखन ज्या त्यांच्या मळ्यांतील घरामध्ये झालें ती वास्तु संस्मरणीय म्हणून महत्त्वाची असल्याने तिचें संरक्षण व्हावें. सध्या ती वास्तु मुंबई सरकारने सांगलीनजीक नियोजित पोलीस हेडक्वार्टर्सच्या जागेसाठी व्यापिली आहे. त्यांतून त्या वास्तूचें रक्षण व्हावें व तिची व्यवस्था म. सा. परिषदेकडे द्यावी अशी मुंबई सरकारला हें संमेलन विनंती करीत आहे.

( एकमताने संमत )

सूचक–चंद्रकुमार डांगे
अनुमोदक–ग. वा. करंदीकर

## ९ जिल्हा-संमेलनें

सोलापूर जिल्हा म. सा. परिषदेच्या शाखेच्या विद्यमाने गेलीं १० वर्षे जिल्हा-संमेलनें सातत्याने भरविलीं जात आहेत व साहित्याचें लोण खेड्यापर्यंत पोचविण्याचें कार्य शाखासभा करीत आहे याबद्दल या संमेलनास संतोष होत असून, अशा तऱ्हेचीं साहित्य-संमेलनें सर्व जिल्ह्यांतून भरविलीं जावीं व साहित्याचें क्षेत्र खेड्यापर्यंत पोचविण्याच्या मराठी साहित्य संमेलनाच्या उद्दिष्टास हातभार लावावा.

अध्यक्षांकडून

## १० औरंगाबाद-नभोवाणी

मराठी साहित्य संमेलनाचें हें ४१ वें अधिवेशन मराठवाड्यांतील औरंगाबादचें नभोवाणी-केंद्र बंद केल्याबद्दल पुन्हा एकदा खेद व्यक्त करतें आणि साहित्य, कला व संस्कृति यांच्या अभिवृद्धीसाठी मराठवाड्यांतील हें नभोवाणी-केंद्र त्वरित पुन्हा सुरू करावें, अशी आग्रहाची मागणी करतें.

अध्यक्षांकडून

## ११ मुंबई सरकारचें अभिनंदन

मराठवाड्यांतील जनतेच्या गरजेनुसार मुंबई राज्य सरकारने मराठवाडा विद्यापीठाची मागणी मान्य केली व मराठवाडा विद्यापीठाची स्थापना त्वरित केली याबद्दल हें संमेलन मुंबई राज्य सरकारचें अभिनंदन करतें. तसेंच मराठी संस्कृति, भाषा व साहित्य यांच्या अभिवृद्धीसाठीं हें विद्यापीठ मोलाचे प्रयत्न करील अशी अपेक्षा व्यक्त करतें.

अध्यक्षांकडून

---

अनुक्रमणिका



# मराठी साहित्य महामंडळ

## साहित्य-संस्था संघीकरणाबाबत मिरज साहित्य संमेलनांत सर्वसंमत झालेला खर्डा.

ज्या अर्थी मराठी साहित्याच्या क्षेत्रांत कार्य करणाऱ्या सर्व संस्थांच्या धोरणांत व कार्यांत एकसूत्रीपणा व सहकार्य असणें इष्ट आहे, त्या अर्थी अखिल मराठी भाषिकांकरिता एक प्रातिनिधिक मध्यवर्ती संस्था पुढीलप्रमाणे स्थापन करण्यांत येत आहे.

१. **नांव**—मराठी साहित्य महामंडळ.

२. **उद्देश**—मराठी साहित्याच्या क्षेत्रांत कार्य करणाऱ्या संस्थांच्या धोरणांत व कार्यांत एकसूत्रीपणा व सहकार्य निर्माण करणें व त्यांचें ह्या घटनेंत निर्देशिलेल्या कार्यासाठी प्रातिनिधित्व करणें.

३. **रचना**—( अ ) मराठी साहित्य महामंडळांत महाराष्ट्र साहित्य परिषद्, विदर्भ साहित्य संघ, मुंबई मराठी साहित्य संघ व मराठवाडा साहित्य परिषद्, यांनी पाठविलेले प्रत्येकी तीन प्रतिनिधि राहतील.

( ब ) ह्याशिवाय, भारतांतील कोणत्याहि राज्यांतील संपूर्ण प्रदेशाकरितां महामंडळाच्या उद्देशास अनुसरून काम करणाऱ्या मराठी भाषिकांच्या संस्थेला दोनतृतीयांश बहुमताने समाविष्ट करून घेण्याचा अधिकार महामंडळाला राहील. अशा समाविष्ट केलेल्या संस्थांचेहि प्रत्येकी तीन प्रतिनिधि प्रस्तुत महामंडळांत राहतील.

( क ) वरील ( अ ) व ( ब ) मधील संस्था वगळून राहिलेल्या कोणत्याहि देशांतील मराठी साहित्याविषयीं महामंडळाच्या धोरणास अनुसरून कार्य करणाऱ्या संस्थेला संलग्न करून घेण्याचा अधिकार महामंडळाला राहील. अशा सर्व संलग्न संस्थांचा एक घटक करून त्यांचे तीनपर्यंत प्रतिनिधि महामंडळांत स्वीकृत करून घेण्याचा अधिकार महामंडळाला राहील.

४. **कार्यक्षेत्र**—महामंडळाचें कार्यक्षेत्र पुढीलप्रमाणें राहील.

( १ ) भाषा व साहित्यविषयक सर्वसामान्य धोरण ठरविणें.

( २ ) सर्व शासनसंस्थांशीं, आंतरराष्ट्रीय, आंतरराज्यीय व भिन्नभाषिक संस्थांशीं व सर्व क्षेत्रांत अवश्य तेथें व्यवहार करून भाषिक व सांस्कृतिक प्रश्नासंबंधीं मराठी भाषिकांचें सर्वतोपरी प्रतिनिधित्व करणें.

( ३ ) अखिल मराठी भाषिकांचीं मराठी साहित्य संमेलनें भरविणें. संमेलनांतील ठराव महामंडळास शिफारसवजा राहतील.

अनुक्रमणिका

( ४ ) घटक-संस्थांनी केलेल्या निवेदनांचा विचार करण.

( ५ ) सर्व घटक-संस्थांच्या संमतीने अन्य कार्य करणें.

५. **कार्यालय**—महामंडळाचें कार्यालय नियम ३ ( अ ) व ( ब ) मधील घटक-संस्थांच्या केंद्रस्थानीं दरवर्षी फिरतें राहील.

६. **कार्यपद्धति**--( अ ) महामंडळाच्या सदस्यांचा कार्यकाल तीन वर्षांचा राहील. त्यांपैकी प्रत्येक घटक-संस्थेचा एक सदस्य दरवर्षी निवृत्त होत जाईल.

(आ) महामंडळ आपल्यामधून एक अध्यक्ष, एक उपाध्यक्ष, एक कोषाध्यक्ष व एक कार्यवाह यांची एक वर्षाकरिता निवड करील. दैनंदिन कार्य अध्यक्षांच्या मार्गदर्शनानुसार कार्यवाह करील.

( इ ) महामंडळाची सभा चार महिन्यांतून एकदा तरी भरविण्यांत येईल. संस्थेचें स्थान शक्यतोंवर घटक-संस्थांच्या ठिकाणीं फिरतें असावें व सभेच्या व्यवस्थेचा खर्च त्या त्या घटक-संस्थेनें करावा. सभेकरिता एकूण संख्येच्या निम्मेएवढी गणसंख्या राहील. सदस्यांचा वाहनखर्च जी ती घटक-संस्था देईल. महामंडळांतील निर्णय बहुमताने घेतले जातील.

( ई ) विशेष कार्याकरिता समित्या स्थापन करण्याचा अधिकार महामंडळास राहील.

७. **निधिव्यवस्था**-( अ ) ह्या घटनेंत अन्यत्र वेगळा उल्लेख नसल्यास, महामंडळाच्या सर्व खर्चाची जबाबदारी समप्रमाणांत सर्व घटक-संस्थांवर राहील. जमाखर्चाची जबाबदारी कोषाध्यक्षांवर राहील.

( ब ) महामंडळास स्वतःच्या कार्यांकरिता देणग्या, अनुदान, कार्यक्रम इ० मार्गांनी निधि जमा करतां येईल.

८. **घटक-संस्थांची स्वायत्तताः**--महामंडळाच्या सर्व घटक-संस्था आपापल्या कार्यक्षेत्रांत स्वायत्त राहतील.

९. **घटनादुरुस्ती** :—महामंडळाच्या एकूण सदस्यसंख्येने दोनतृतीयांश बहुमताने घटना-दुरुस्ती सुचविल्यास व घटक्-संस्थांच्या कार्यकारी मंडळांपैकी दोनतृतीयांश कार्यकारी मंडळांनी बहुमताने मान्यता दिल्यास प्रस्तुत घटनेंत दुरुस्ती करण्यांत येईल.

१०. **मध्यंतरकालीन व्यवस्थाः**—( अ ) वर नियम ३ ( अ ) मधील घटक-संस्थांनी ह्या घटनेला संमति देऊन संमतिपत्र महाराष्ट्र साहित्य परिषदे-कडे पाठवावें व त्याबरोबरच आपल्या तीन प्रतिनिधींचीं नांवें

कळवावीत. ही माहिती येतांच एक महिन्याच्या आंत महाराष्ट्र साहित्य परिषदेच्या अध्यक्षांनी महामंडळाची पहिली सभा बोलवावी. महामंडळाच्या स्थापनेसंबंधीं सर्व व्यवस्था महाराष्ट्र साहित्य परिषदेने करावी.

( ब ) महामंडळाचें कार्यालय प्रथम वर्षी मुंबई येथे राहील व त्यापुढील व्यवस्था महामंडळ करील.

( क ) अखिल मराठी भाषिकांचें साहित्य संमेलन भरविण्याची योजना तयार करून महामंडळाने आपल्या स्थापनेपासून पांच वर्षांत किंवा तत्पूर्वी कार्यान्वित करावी. तोंवर महाराष्ट्र साहित्य परिषदेने मराठी साहित्य संमेलनाची विद्यमान कार्यवाही चालू ठेवावी.

( ड ) घटक-संस्थांकडून महामंडळांत सर्वप्रथम पाठवावयाचे तीन प्रतिनिधि निवडतांना त्यांपैकी एक प्रतिनिधि एक वर्षाकरिता, दुसरा दोन वर्षाकरिता व तिसरा तीन वर्षांकरितां निर्दिष्ट करण्यांत येईल.

टीपः— औरंगाबाद संमेलनांतील ठरावानुसार अस्तित्वांत आलेल्या साहित्यसंस्था-संघीकरण-समितीच्या दोन बैठकी मिरज संमेलनप्रसंगीं भरल्या होत्या व त्यांत वरील खर्डा संमत झाला. बैठकीस श्री. आ. रा. देशपांडे (अध्यक्ष), म. म. प्रा. द. वा. पोतदार, श्री. श्री. शं. नवरे ( म. सा. परिषद् ), श्री. पु. दि. ढवळे, श्री. श्री. गो. काशीकर ( वि सा. संघ ), प्रा. रा. ब. माढेकर ( मराठवाडा सा. परिषद् ) हे सभासद व म. सा. परिषदेचे कार्याध्यक्ष श्री. य. दि. पेंढरकर उपस्थित होते. श्री. अनंत भालेराव ( मराठ. सा. परिषद् ) व प्रा. न. र. फाटक व श्री. दि. वि. आमोणकर ( मुं. म. सा. संघ ) हे अनुपस्थित होते.

---

## साभार—स्वीकार

**१ आमचे तात्या**— संपा. अंबादास तु. देवळे; प्रा. सुरेश म. डोळके ग्रंथ प्रकाशन समिति नागपूर; ३ रु.

**२ नाट्यछटा**— रा. पु. लगदेव; कॉंटिनेंटल प्रकाशन, पुणें २; १॥ रु

**३ विधिशास्त्रविचार**—न. वि. गाडगीळ; चित्रशाळा प्रकाशन, पुणें २; १० रु.

**४ कौरव पांडव युद्ध**—ले. प्रका. अण्णासाहेब आठवले; किर्लोस्करवाडी; रु. १=२५

**५ आरती** ( प्रातिनिधिक काव्यसंग्रह )— संपा- अशोक देशपांडे, सुधाकर प्रभु; सहकार प्रकाशन, पंढरपुर, १ रु.

**६ भारताचे महापुरुष**— ले. प्रका. राजसाठवे; येरवडा पुणें ६; ३७ न. पै.

### पॉप्युलर बुकडेपो मुंबई ७ प्रकाशनें :—

**७ श्रीपाद कृष्ण : वाङ्मयदर्शन**— वा. ल. कुलकर्णी, ४ रु.

**८ उडता गालीचा**— प्रभाकर पाध्ये; ३=५० रु.

### महाराष्ट्र ग्रंथ भांडार कोल्हापुर; प्रकाशनें

**९ विदूषक** – गो. के. भट; ९=५० रु.

**१० वेडगांवचे शहाणे** – गो. के. भट; ३ रु.

### मराठी थिऑसफिकल फेडरेशन १८ गणेशवाडी पुणें ४ प्रकाशनें :—

**११ समर्थांचा वगीचा**— वा. ल. चिपळूणकर; २ रु.

**१२ मनुष्याला आत्मा असतो काय ?**

**१३ लोकशाही शासन कसें चालतें**— फ्रॅन्सिस हॉनकिन; शं. रा. दाते, यशवंत छापखाना, सदाशिव, पुणें २; २ रु.

---

मुद्रक :– म. ना. चापेकर, आर्यसंस्कृति मुद्रणालय, १५७५/२ सदाशिव, पुणें २.
प्रकाशक :– य. दि. पेंढरकर, कार्याध्यक्ष, महाराष्ट्र-साहित्य-परिषद, टिळक-रस्ता, पुणें २.

महाराष्ट्र साहित्य परिषदेचें त्रैमासिक मुखपत्र



संपादक

वा. रा. ढवळे

वर्ष ३३ : अंक १३० जुलै–ऑगस्ट–सप्टेंबर १९

या अंकांत

प्रा. सुरेश म. डोळके, श्री. ना. ब. जोशी, डॉ. म. म. वा. वि. मिराशी, डॉ. म. गो. माईणकर, श्री. म. दा. साठे, डॉ. के. ना. वाटवे, श्री वि. म. कुलकर्णी, श्री. ग. प्र. प्रधान, शिवाय संपादकीय, परिषद्वार्ता इत्यादि.

अनुक्रमणिका








## महाराष्ट्र-साहित्य-परिषद्-प्रकाशनें

◆

| | | |
|---|---|---|
| १ | मराठी भाषेचा व वाङ्मयाचा इतिहास ( मानभावअखेर ) | |
| | ले. कै. बा. अ. भिडे | ( प्रती शिल्लक नाहींत. ) |
| २ | म. सा. परिषद् - इतिहास | रु.न.पै. |
| | ले. द. वा. पोतदार | ३=०० |
| ३ | संत-वाङ्मयाची सामाजिक फलश्रुति | २=०० |
| | ले. गं. बा. सरदार | |
| ४ | वाङ्मय समालोचन ( १९४७ ) | २=०० |
| ५ | वाङ्मयीन वाद ( पुरस्कृत ) | ३=०० |
| ६ | निबंध-विकास ( प्राज्ञ परिक्षेस लावलेलें ) | २=५० |
| ७ | साहित्य सुगंध ( प्रवेश ,, ,, ) | २=५० |
| ८ | सारस्वत प्रवेश ( प्रथमा ,, ,, ) | २=०० |
| ९ | शुद्धलेखन नियम ( १९५९-नवी आवृत्ति ) | ०=१५ |

( क्र. ३ व ५ या पुस्तकांची मागणी अनुक्रमें व्हीनस बुक स्टॉल, पुणें २; व प्रसाद प्रकाशन, सदाशिव पुणें २ यांचेकडे करावी. )

इतर चौकशीः-चिटणीस, महाराष्ट्र साहित्य परिषद्,
टिळक रस्ता, पुणें १.

### — दुरुस्ती —

'पत्रिके'च्या मागील अंकांतील 'मुक्तेश्वरावर प्रकाश' या लेखांत मुक्तेश्वराच्या देवळासंबंधी लिहितांना गावाचें नांव देण्यांत चूक झाली आहे. 'चौदडंपूर'च्या ऐवजीं 'चौडदानपूर' असें हवें.